नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

[त्रैमासिक]

## ६३

संपादक—के. नारायण काळे
बी.ए., एल्‌एल्‌.बी.

आषाढ १८६४

वर्ष १५ वें] जुलै १९४२ [अंक ३ रा

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## सन १९४१-४२ च्या दुसऱ्या सहामाहींत डे. व्ह. ट्रा. सोसायटीने बक्षिसें व प्रसंशापत्रें दिलेल्या पुस्तकांची यादी

| पुस्तकांचें नांव | कर्त्यांचें नांव | बक्षिसाची रक्कम |
|---|---|---|
| | | रु. |
| १ मार्क्सचा भौतिकवाद | रा. पां. वा. गाडगीळ | ३० द. प्रा. फंडांतून |
| २ शारीरिक शिक्षण | रा. शि. ल. ओगले | ४० ,, |
| ३ दाजी भाग २ रा | रा. ना. धों. ताम्हनकर | ४० ,, |
| ४ विचारसमीक्षा | रा. वा. ना. देशपांडे | ४० ,, |
| ५ वेदांतील गोष्टी भाग २ | रा. वि. कृ. श्रोत्रीय | ३० ,, |
| ६ व्यायाम ज्ञानकोश खंड ५ वा | रा. द. चिं. मुजुमदार | १०० ,, |
| ७ जगाचा इतिहास | रा. रा. ना. नातू | १०० ,, |
| ८ मलिक अंबर | रा. वि. स वाकसकर | २१ दि. ब. गोडबोले प्रा. |
| ९ शेतीसुधारणा | रा. के. स. केळकर | १५ ल. ब. फाटक प्रा. |
| १० गोष्टी | रा. ना. धों. ताम्हनकर | १५ कृ. र. केळकर फंड |
| ११ मराठी नाट्यसृष्टि, पौराणिक नाटकें | रा. वि. पां. दांडेकर | ७५ देशमुख फंड |
| १२ श्रीतुलसी रामायण—मराठी भाषांतर | रा. या. शं. जामदार | ५० ,, |
| १३ मराठीचिये नगरीं भाग १ ला | रा. द. रा. कानेगांवकर | २० ,, |
| १४ शिवाजीची राजनीति | रा. भा. वा. भट | ३० ,, |
| १५ भारतीय तर्कशास्त्रप्रवेश | रा. रघुनाथशास्त्री कोकजे | १०० अिचलकरंजी प्राअीझ |
| १६ कविवर्य वामन पंडितकृत कविता—संग्रह भाग २ रा | रा. दा. के. ओक | ४५ अिचलकरंजी प्रो. मानू प्राअीझ |
| १७ पायथॅगोरसस्मृति | रा. कृ. वि. फुलकर्णी | ५० संस्थेचे फंडांतून |
| १८ यशोनिधि | रा. य. दि. पेंढरकर | ३० ,, |
| १९ उपेक्षितांचें अंतरंग | प्रो. श्री. म. माटे | ३० ,, |
| २० मराठीचें साहित्यशास्त्र | डॉ. माधव गोपाळ देशमुख | ४० ,, |
| २१ महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी | रा. गंगाधर बाळकृष्ण सरदार | ४० मुळ्ये प्राअीझ |
| २२ कौमुदी | रा. ह. न. जोशी | प्रशंसापत्र |
| २३ चित्रवंशदीप काव्य भाग २ | श्रीसमर्थदास रामदासी | ,, |
| २४ नवें गुंद्रावाई | रा. शं. दि. परंदीकर | ,, |
| २५ शिवार | रा. के. नारखेडे | ,, |
| २६ साहित्यप्रकाश | रा. दाजी नागेश आपटे | ,, |
| २७ गद्यकीर्तनमाला | रा. दामोदर रामकृष्ण बापट | ,, |



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## वर्गणीविषयक माहिती

म. सा. पत्रिकेची वार्षिक वर्गणी — रु. ४॥ (ट.ख.सह).

परिषदेचे सभासद व संलग्नसंस्था — वा. व. रु. ३ (म. सा. पत्रिका विना-मूल्य पाठविली जाते)

पत्रव्यवहाराचा पत्ता— महाराष्ट्र साहित्य परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.


महाराष्ट्रांतील प्रसिद्ध व व्यासंगी लेखक-लेखिकांनी लिहिलेलें विविध विषयांवरील वाचनीय व मननीय साहित्य दरमहा प्रसिद्ध करणारीं तीन चित्ताकर्षक मासिकें—

किर्लोस्कर

स्त्री व मनोहर



वार्षिक वर्गणी प्रत्येकी ३ रु.
कोणत्याहि दोहोंची ५॥ रु.
तिन्ही मासिकांची ८। रु.

आजच आपली वर्गणी पाठवा— किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

वर्ष १५ वें ] **अनुक्रमणिका** [ अंक ३ रा





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

## *अभंग छंद (२)

१

मंद मंद वाहे झुळुक वाऱ्याची ।
कळी गुलाबाची । डोलूं लागे ।
गोड गोड हासे वसंत वनांत ।
कोकीळ कूजत । स्वैरपणें ।
हिमालय दावी अुषेचें दर्शन ।
गुंगुनिया मन । वेडावतें ।
तुझी प्रीती परी जगाच्या वेगळी ।
अुदयाच्या वेळीं । अस्त पावे ॥

अहंतेच्या कोशें वेढीयली कळी ।
होअीना मोकळी । तयांतून ।
तुझ्या मनांतील कोकीळ गाअीना ।
आला कुढेपणा । त्याच्या आड ।
देखाव्यांत फुका भुलूनिया मन ।
गेलें विसरून । मूळ भाव ।
परी पटलेली साक्ष मनोमन ।
कशी विसरेन । अेकाअेकीं ॥

२

फुलपाखरूं हें हृदींचें माझीया ।
अधीर अुडाया । तुजपाशीं ।
तुजपाशीं याया बळें घेअी ओढ ।
करी फडफड । पंख सान ।
तुजकडे जाया वेडावला जीव ।
परी न जाणीव भविष्याची ।
भविष्याच्या पोटीं कांहीहि असूं दे ।
दर्शन लाभूं दे । लवलाही ॥

जिण्याच्या दुपारीं होअी आगडोंब ।
पार जळे सुंभ । पीळ राही ।
जीव होअी सुना दोन चार वेळां ।
अंतरीं अुमाळा । ओसंडत ।
अुमाळा ओसंडे वरी अुतू जाअी ।
परी आंत खाअी । धगधगे ।
धगधगे आग, वांचव पांखरा ।
जगूं दे बिचारा । जीव माझा ॥

३

प्रेम करीतसें तुजवरी पुन्हा ।
मज राहवेना । प्रेमाविण ।
माझिया प्रेमाची होअूं दे निराशा ।
तीच माझी आशा । याच्यापुढे ।
प्रेमाची चढण मारीच कठीण ।
परी तिजवीण । नसे गती ।
अेकाच्यावरून अनेकांच्या ठायीं ।
विकसन होअी । साहजिक ॥

जें जें म्हणूनीया निर्व्याज निर्मळ ।
स्नेहाचें सोज्वळ । तेंच रूप ।
दुःख साहुनी जे रंजले-गांजले ।
प्रेमपात्र झाले । जगीं तेच ।
जीवमात्र सारे प्रेमाचे भुकेले ।
त्यांस देअूं केलें । स्नेहजल ।
तुझीया प्रेमाचा अद्‌भुत विशेष ।
व्ययाने विकास । साधीयला ॥

---

* "अभंग छंद" नांवाच्या आगामी संग्रहांतून.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

४

मंद पहाटेस कोंबडसाद ये ।
त्यांतुनी ये सये । तुझी हाक ।
बैलरहाटाची चाले कुरकूर ।
मनीं हुरहूर । सुरू होअी ।
अंधाराचे करी दूर पांघरूण ।
जागी झोपेंतून । होअी बाग ।
सागरतीरींची शीतल लहरी ।
पवनाच्या सूरीं । देते साद ।
झुळझुळा वाहे पाटांतून पाणी
वसे बीळखोनी । पाअूलांस ।
आज, सखे, बाग भासते जिवंत ।
तुझ्या चाहुलींत । शक्ती अैसी ॥

५

अुंच अुंच अुभे सुरूंचे हे रोप ।
यौवन अमाप । ओसंडत ।
अुंच आंगकाठी सरळ तरळ ।
जीवनींचें बळ । संचरलें ।
वायूची अंगुली भिडतां थरारे ।
रोमांच फुरारे । पानोपानीं ।
सखये, सुरूंच्या बनीं करी सुरू ।
मनींचें पाखरू । फडफड ।
अरेरे तयांचा प्रारंभीं शेवट ।
कांहीं गुजगोष्ट । करीशी ना ।
सुरूंच्या हृदींचा सूं सूं ये अुसासा ।
पडसाद त्याचा । मम मनीं ॥

६

दोन-पार झाली— कवडा घुमतो ।
आगरीं विरतो । शब्द त्याचा ।
गंभीर हो नाद दरीयाच्या जळीं ।
पहाडांच्या तळीं । पडसादे ।
सळळ सरके मुंगूस वाडींत ।
आणि स्तब्धतेंत । बाली भर ।
केतकीच्या बनीं डोलते नागीण ।
'स्व'भावाचें भान । विसरली ।
मध्याह्नीं, गे, अैशा कुणाचें पाअूल ।
दारांत मागील । मंद वाजे ।
वाटलें, सखये, येशी न कळत ।
परी तो अव्यक्त । भास तुझा ॥

७

गर्द आंबेवन लवलें माराने ।
पिवळें ग सोनें । वरी पिके ।
पिक तयावरी घालितात रुंजी ।
लुटीतात पुंजी । रससिद्ध ।
त्यांतील कुणीसा नटुला पोपट ।
कवटाळी घीट । डहाळीला ।
दोल्यावरुनी तो हिंदोळे जरासा ।
चाखी गोड रसा । फळाचिया ।
तोंच झाडींत हो कुणाची गे शीळ ।
साळुंकी मंजुळ । गाते गाणें ।
बोलवीता धनी अुडे तिजकडे ।
परी न सांपडे । अजुनी ती ॥

८

पाणीयाने पुरी तुडुंबली शेती ।
आनंदांत गाती । शेतकरी ।
वाजवीतो पांवा गुराख्याचा पोर ।
साखेसुधे सूर । किती गोड ।
तेणें नाचताती गायरें-वासरें ।
भरलीं अंतरें । अुल्हासाने ।
बाजूस वहातो ओढा झुळझुळ ।
करी चुळबूळ । कुणासाठी ।
हळूच खुणवी सजणा सजणी ।
करितां लावणी । लागे धून ।
रोपांच्या अंतरीं थरारे लहरी ।
संवेदना करी । मम मनीं ॥

९

सह्याद्रीचा हात कोकणीं पसरे ।
सागरांत शिरे । करंगळी ।
नागमोडी चढे तयावरी वाट ।
चालें झटझट । प्रवासी मी ।
भोवती पसरे अरण्य भयाण ।
श्वापदें भीषण । फीरकती ।
घाटीच्या पायथीं खाडींत डोलती ।
नौका, खुणावीती । शीडहातें ।
नारळींचे पंजे दूर हालताती ।
मज बोलावीती । परतून ।
तयांच्या आडून कोण डोकावे ती ।
मनोमय मूर्ती । तुझी भासे ॥

— ना. ग. जोशी

# आत्महत्या आणि कविता

[ ले०- श्री. अ. ज. करंदीकर ]

साहित्यसंगीतकलाविहीनः । साक्षात्पशुः पुच्छविषाणहीनः ॥
तृणं न खादन्नपि जीवमानः । तद्भागधेयं परमं पशूनाम् ॥

या प्रख्यात श्लोकांत भर्तृहरीने अुल्लेखिलेले नरपशु तृणावर अुपजीविका करीत नाहीत, हें त्या महाकवीच्या मताप्रमाणे पशूंचें परम भागधेय असलें तरी साहित्यादि कलांच्या द्वारा सौंदर्योपासना करणाऱ्या मानवांचें तें परम दुर्भाग्यच म्हटलें पाहिजे. कारण हे नरपशु खऱ्या मानवांचें अन्न खाअून त्यांचा जीवनपथ वैराण करून सोडतात, अितकेंच नव्हे तर आपलें अनुकरण न करण्याच्या अपराधाबद्दल शक्य त्या त्या प्रकारांनी त्यांचा छळ करून त्यांना आपलें जीवनहि असह्य करून सोडतात. बुद्धि आणि हृदय या दोनहि दृष्ट्या सर्वस्वीं हीन प्रतीचे असणारे नरपशु श्रेष्ठ मानवांवर आपलें वर्चस्व प्रस्थापित करण्याकरिता नित्य कपट आणि क्रौर्य यांचा प्रयोग करीत असतात. अत्यंत क्षुद्र प्रतीच्या वैयक्तिक स्वार्थापलीकडे यांना कांहीहि दिसत नसल्याने हे नरपशु पृथ्वीचा अक्षरशः नरक बनावितात. हाअुसमनने आपल्या सूत्रमय भाषेंत म्हटलें आहे,

All thoughts to rive the heart are here and all are vain :
Horror and scorn and hate and fear and indignation—

बहुतेक सर्वच श्रेष्ठ मानवांना असल्या नरपशूंच्या अुपद्रवामुळे या मानीव मानवलोकांतच खरोखरीच्या नरकयातना भोगाव्या लागल्या आहेत. त्या भुक्तभोग्यांव्यतिरिक्त अितरांना या नरकाची कल्पना तरी कशी येणार? या दुस्सह परिस्थितींत सौंदर्योपासकांच्या मनाला धीर देणारी अशी अेकच घटना आहे. ती ही की पृथ्वीवरील हा नरक निदान चिरंतन तरी नाही, मृत्यूनंतर तरी या नरकांतून आपली सुटका होअील.

Be still, be still my soul, it is but for a season,
let us endure an hour and see injustice done.

सौंदर्योपासकांना या ज्या यातना भोगाव्या लागतात, त्या मुख्यतः स्वदेशांत आणि स्वतः-च्या समाजांतच भोगाव्या लागतात. यामुळे पुष्कळांना परदेशगमन करूनहि या यातनांतून सुटका करून घ्यावीसें वाटतें. पण माझ्या स्थितिप्रिय स्वभावाला महाराष्ट्राचा वियोगहि सोसवत नाही आणि आजच्या महाराष्ट्रीय जीवनांतील स्पर्धा आणि कलह यांचा क्षुद्रपणाहि सोसवत नाही. यामुळे परदेशगमनाच्या अुपायाचा मीं थोड्या अभिनव पद्धतीने अवलंब केला आहे. अितरेजनांप्रमाणें शारीरिक परदेशगमन न करतां मीं केवळ मानसिक परदेशगमन केलें आहे; म्हणजे स्वतःला परभाषांच्या अध्ययनाचा नाद लावून घेतला आहे. स्वदेशांत राहून परभाषांचें अध्ययन करण्याने त्या अध्ययनाची वास्तविक माधुरी चाखतां येत नाही. परभाषांच्या अध्ययनांत सुख केव्हा लाभतें हें बायरननें डॉन जुआनमध्ये सांगितलें आहे.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

It is pleasing to be schooled in a strange tongue
By female lips and eyes— that is, I mean
When both the teacher and the taught are young.

पण परक्यांच्या प्रेमाऐवजीं स्वजनांच्या तिरस्कारामुळेच ज्याने स्वतःला परभाषांचा नाद लावून घेतला त्याला असलें सुख कसें लाभणार ? तरी सुद्धा प्रत्येक समृद्ध परभाषेच्या अध्ययनानंतर मला अगदी अभिनव दृष्टि लाभल्याचा अनुभव आला आणि अनेक बाबतींत माझी विचारसरणी सुशिक्षित महाराष्ट्रीयांच्या सामान्य विचारसरणीहून सर्वस्वीं भिन्न बनली. पुन्हा आपल्या परिचित ग्रंथचोरांना न येणाऱ्या भाषा शिकण्यामुळे आपले आवडते ग्रंथ संभाळण्याचें अेक अमोघ अस्त्रहि मला लाभलें.

परभाषांच्या अध्ययनाने स्वतःचा समाज आणि आपण यांच्यांत जो प्रभेद अुत्पन्न होतो तो केवळ स्वसमाजांतील अेखाद्या व्यक्तीच्या प्रेमामुळेच नष्ट होअूं शकतो. स्वतःपुरतेंच बोलायचें तर मला असें प्रामाणिकपणाने म्हणतां येअील की प्रभा फार मधुर मराठी बोलते, म्हणून मला मराठी भाषेविषयी प्रेम वाटतें; तिला मराठी वाङ्मय वाचावेंसें वाटतें, म्हणून मला मराठींतच लिहावेंसें वाटतें. माझी तर अशीच समजूत आहे की स्वसमाजांतील स्त्रियांच्या प्रेमामुळेच पुरुषांना स्वभाषा, स्वधर्म आणि स्वदेश यांचा अभिमान आणि प्रेम वाटतें. माझी ही समजूत चुकीची आहे असें जर आता कोणी आपल्या मनाशीं म्हणत असतील किंवा अितःपर मला सांगायला येतील तर त्यांच्या दुर्दैवाची मला कीवच येअील.

माझें परभाषांचें वेड प्रभेला फारसें रुचत नाही हें सरळच आहे. कारण आपल्या स्वतःच्या वेडावांचून मला दुसरें कोणतेंहि वेड असूं नये असा तिचा नेहमीचाच आग्रह असतो. या तिच्या आग्रहामुळे आपलीं आवडतीं पुस्तकें संभाळण्याचें माझें अमोघ अस्त्रहि केव्हा केव्हा मोघ होतें. कारण परभाषा शिकणाऱ्यांच्या सोअीसाठी अलीकडे अनेक ग्रंथ दोन भाषांतून छापतात आणि मग त्या भाषांपैकी केवळ अिंग्रजी जाणणाऱ्यांनाहि ते हाताळतां येतात. विशेषतः प्रभेला तीं पुस्तकें अुचलून नेतां येतात. असेंच अेक पुस्तक फारा दिवसांत परत न आल्यामुळे मीं प्रभेला विचारलें, 'माझें पुष्किनच्या गोष्टींचें पुस्तक तूं परत देणार आहेस तरी केव्हा ?'

'तुझें हें परभाषा शिकण्याचें वेड सुटणार आहे तरी केव्हा ?' प्रभेने प्रतिहल्ला चढविला.

'तुझ्या हृदयाची भाषा कळूं लागली म्हणजे.' आपलें हृद्गत मीं मोकळ्या मनाने तिला सांगून टाकलें. तेव्हा आरक्तवदन होअून प्रभा म्हणाली, 'असा जर तुझा पणच असला तर मग तें वेड सुटण्याची आशाच करायला नको. कारण स्त्रीच्या हृदयाची भाषा पुरुषांना कळणेंच शक्य नाही अशी माझी स्वतःची तर ठाम समजूत आहे. त्यांतून ती कोणाला कळतच असली, तर केवळ कवींनाच कळते, असें लोक म्हणतात. तेव्हा तुझ्यासारख्या अकवीला ती कळण्याचा संभवसुद्धा नाही.'

'पण केवळ कवि होण्याने तुझ्या हृदयाची भाषा कळणार असली तर तेवढ्याकरिता मी कवि होअूं शकणार नाहीं, असें का तुला वाटतें ?'

'कवि होअूं शकण्याची भाषा आज मी नवीनच अैकतें. आजपर्यंत तर अैकत आलें आहें की poets are born, not made.'



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

'But a poet is often made by such a unique maid.' मीं हें अुत्तर दिलें तेव्हा माजिद कवीचा अेक शेर माझ्या मनांत घोळत होता.

सारा जहान अुनको अजलसे अता हुवा,
और यक दिल मिला हमें सबके जवाबमें.

पण आपल्या बुद्धिमत्तेचा अभिमान बाळगणाऱ्या त्या मानिनीवर माझ्या अुत्तराचा अगदींच विपरीत परिणाम झाला आणि पराकाष्ठेचा तिरस्कार व्यक्त करीत ती म्हणाली, 'असले भिकारडे श्लेष करून भिकारडा कवि बनण्याची पात्रता सिद्ध करण्यापेक्षा आत्महत्या करणें बरें, असें मला तरी निदान वाटतें.'

या अनपेक्षित आघातामुळे मला पुन्हा अेकदा माजिदचीच आठवण झाली.

वह लडकपनका था हुस्न और यह जवानीकी बहार,
तिल यही पहलेही था मगर कातिल न था.

पण त्या नवविनयमदर्पित तरुणीच्या तिरस्काररूपी अुपहाराचा सादर स्वीकार करून मीं म्हटलें, 'मला सुद्धा अगदी तुझ्यासारखेंच वाटतें. पण त्याचा परिणाम मात्र तुझ्या अिच्छेच्या अगदी अुलट होअील. कारण अेखाद्याने आत्महत्येचा प्रयत्न करणें म्हणजे आपलें सामान्य मनुष्यत्व टाकून कवित्वाचा बाप्तिस्मा घेण्यासारखेंच आहे. Where life ends, art begins हें वाअिल्डचें सूत्र तुला माहीत नाहीसें दिसतें.'

'पण मी मुळी आत्महत्येचा प्रयत्न करण्याविषयी बोलतच नव्हतें, प्रत्यक्ष आत्महत्या करण्याविषयी बोलत होतें.' प्रभेने टोचून अुत्तर दिलें.

'पण ती तुझी चूक होती. कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदा च न. आत्महत्येचा प्रयत्न करणेंच काय तें आपल्या हातीं असतें. त्या प्रयत्नाला यश येणें किंवा न येणें हें कांही आपल्या हातीं असत नाही.' न वाचलेल्या गीतेचा आधार दाखवून मीं आत्मसमर्थन करण्याचा प्रयत्न केला. तरी सुद्धा आपला आग्रह न सोडतां प्रभा म्हणाली, 'पण फिरून प्रयत्न करून पाहणें तर आपल्या हातीं असतें !'

'आपल्या म्हणजे कुणाच्या हातीं असतें हें तरी तुला माहीत आहे का ? जिवावरच्या संकटांतून वांचलेलीं मुलें जशीं आअीबापांचीं लाडकीं बनतात तसे आत्महत्येच्या प्रयत्नानंतर-सुद्धा जे जिवंत राहतात ते देवाचे लाडके बनतात आणि मग आपलीं कामें दुसऱ्यांच्याकडून करून घेण्याचे लाड त्यांना सुचायला लागतात. त्यांना असें वाटायला लागतें की आपल्या हाताने आपली हत्या करण्याचा फिरून प्रयत्न करीत बसण्यापेक्षा अितःपर आपण स्वतःवर मारेकरीच घालूं म्हणजे झालें.'

'अुगीच कांही तरी वेड्यासारखें बरळूं नकोस. तुझ्या शत्रूंनी जर तुझें हें बोलणें अैकलें तर तुला वेडा ठरवायला तूं स्वतःच त्यांना शस्त्र पुरविल्यासारखें होअील.'

'पण प्रभे, आत्महत्येंत अपयश आल्यावर स्वतःवर मारेकरी घालण्याची ही कल्पना मीं नाही प्रथम काढली. ती मूळची सर मुहम्मद अिकबालसारख्या सर्वमान्य कवींची कल्पना आहे. मात्र ही कल्पना अितरांना सुचली नसली तरी त्यांचें वर्तन तिला अनुसरूनच असतें. कारण मुख्यतः स्वतःविरुद्धच अुपयोगी पडतील असलीं शस्त्रें आपल्या शत्रूंना पुरविणें म्हणजे स्वतःवर मारेकरी घालणेंच नव्हे का ?'



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

'तें तर अुघडच आहे. पण असल्या गोष्टी करणारे कोणी कर्णाचे अवतार आता जगांत अुरले नाहीत.'

'असें मात्र समजूं नकोस. यथा स्त्रीणां तथा वाचां साधुत्वे दुर्जनो जनः हें भवभूतीचें वचन आता सहस्राहून अधिक वर्षांच्या अनुभवाने खरें ठरलें असूनसुद्धा अजून कवि कविता लिहून प्रसिद्ध कां करतात? अर्थात् आत्महत्येंत आपल्याला अपयश आलें असलें तरी निदान टीकाकारांना आपली हत्या करण्यांत यश येअील या अपेक्षेनेच ते हें आत्मघातकी कृत्य करीत असतात. अितकेंच नव्हे तर टीकाकारांच्या शरसंधानाला बळी पडण्याच्या आशेनेच ते अेरवीच्या व्यवहारांतसुद्धा आपल्या विक्षिप्तपणाचें प्रदर्शन करीत असतात.'

'कवि लोक लाडावल्यासारखें वागतात आणि आपल्या विक्षिप्तपणाचें प्रदर्शन करीत असतात खरेंच. पण तेवढ्याने कांही, तूं म्हणतोस त्याप्रमाणे, आत्महत्येचा प्रयत्न करूनच त्यांनी कवित्वाचा बाप्तिस्मा घेतला असतो ही गोष्ट नाही सिद्ध होत. आणि टीकाकारांच्या बोथट बाणांना आजपर्यंत कोणी कवि बळी पडला असेल हें तर मला शक्यच वाटत नाही.'

'कवि आणि कविता यांच्यासंबंधी हव्या त्या गोष्टी सुचवायच्या असतात पण त्या कधी सिद्ध करायच्या नसतात. कारण To suggest is to create, to name is to destroy असा कवींचाच अेक आवडता सिद्धान्त आहे.'

'असलीं निरर्थक निमित्तें सांगण्यापेक्षा आत्महत्येचा आणि कवित्वाचा केवळ बादरायण-संबंध आहे असें कां स्पष्ट सांगत नाहीस!'

'बादरायणसंबंध चार लोकांत बोलून दाखविण्याची कधी लाज वाटत नाही. पण समाजांत कुप्रसिद्धि मिळविलेल्या नातेवाअिकांचें नातें मान्य करणेंच जिवावर येतें. आत्महत्या ही कवितेची सख्खी वडील बहीण आहे. पण आक्काबाअीच्या दुष्कीर्तीमुळे, कवितेने हें नातें समाजापासून लपवून ठेवलें आहे इतकेंच.'

'मग या विक्षिप्त बहिणींचे परस्परसंबंध तुलाच तेवढे कसे कळले?'

'ती अेक स्वतंत्र कथाच आहे. आणि मी ती सांगायला लागलों तर तूंच म्हणशील की मुळांतच कांही मुद्दा नव्हता, म्हणून हें विषयान्तर आरंभिलें आहे झालें.'

'गोष्ट अैकून झाल्यावर मी वाटेल तें म्हणेन. पण फारा दिवसांत तूं मला गोष्ट सांगितली नाहीस. तेव्हा आता ही गोष्ट सांगितल्यावांचून मी तुला पुढे बोलूं देणार नाहीं.

'तुला माहीतच आहे की मी शाळेंत होतों तेव्हा सुद्धा खरोखरीचा विद्यार्थी होतों, परीक्षार्थी नव्हतों. त्या वेळीं परीक्षादेवीने नव्हे तर विद्यादेवीने मला माळ घालावी ही माझी सर्वांत मोठी महत्त्वाकांक्षा होती. या महत्त्वाकांक्षेच्या मार्गांतलें अेक मोठें विघ्न हें होतें की माझें आणि गुरुजनांचें वारंवार वाकडें येत असे. माझा गुरु नीचीचा असल्याने मला चांगले गुरु क्वचित् भेटले याचें आता नवल वाटत नाही. पण त्यामुळे तेव्हा मला सुचेल त्या मार्गाने विद्येची आराधना करावी लागली. याकरिता रात्रिजागर, अल्पान्नसेवन इत्यादि साधनें करीत असतांना अेके दिवशीं अशी प्रेरणा झाली की अेकांतवेताळाला वश करून घेतलें तर आपली अिच्छा सहज सफळ होअील. या प्रेरणेप्रमाणे मोठ्या प्रयत्नाने मीं अेकांतवेताळाला वश करून घेतलें. हा वेताळ वश झाल्यानंतर अनेक विषयांत माझी मति खोल जायला लागली आणि 'सर्वज्ञ माधवा'प्रमाणे आपणहि सर्वज्ञ होण्याची मला आशा वाटूं लागली. पण पुढे लौकरच असा अनुभव आला की या वेताळाला सांगितलेलीं सर्व कामें चांगल्या रीतीने पार पाडीत

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

असला तरी त्याला अखंड काम न मिळाल्यास तो तत्काळ आपल्या मालकाला खायला अुठतो. या त्याच्यां स्वभावाच्या भीतीमुळे शाळा सोडल्यानंतरसुद्धा अनेक वर्षेपर्यंत मी त्याला अखंड काम पुरवीत गेलों. पण सरतेशेवटीं अतिश्रमाने, अनिद्रेने, अनशनाने आणि विशेषतः अेकांतवेताळाच्या अखंड साहचर्यामुळे माझी प्रकृति अगदी बिघडून गेली. तेव्हा मीं त्याला घालवून देण्याचे अनेक प्रयत्न केले. पण कांहीं केल्या तो मला सोडीना. त्याने मला स्पष्टच सांगितलें कीं विद्यादेवीचा कोणीहि अुपासक गुरुजनांच्या साहाय्यावांचून माझ्या तावडींतून सुटूं शकत नाहीं. तेव्हा बाहेर जाणाऱ्यांचीं पावलें न दिसणाऱ्या सिंहाच्या गुहेचीच मला आठवण झाली. मीं त्याची फारच विनवणी केली तशी त्याने मला अेका अटीवर सोडून द्यायचें मान्य केलें. त्या क्षणीं मोठ्या अुत्सुकतेनें मीं त्याला वचन दिलें कीं तूं घालशील ती अट मला आहे. तेव्हा तो वेताळहि अगदी सभ्यपणाने मला म्हणाला, 'मी पण तुला भलतीसलती अट घालणार नाहीं. अेकट्याच्या अेकांतावरचें औषध दोघांजणांचा अेकांत हें जगांत सुप्रसिद्धच आहे. हाच अुपाय मी तुला सुचविणार आहें. माझ्या दोघी मुलींपैकी अेकीशीं तूं लग्न केलेंस तर मी तुझ्या वाटेस जाणार नाहीं.' त्या वेताळाच्या संगतीला मी इतका विटलों होतों की तुझ्या अेकाच काय पण दोघींहि मुलींना वरीन, इतःपर तूं मात्र मळा छळूं नकोस असें वैतागाच्या भरांत मी बोलून गेलों. या वैतागलेल्या संमतीनेच संतुष्ट होअून वेताळ म्हणाला, 'माझ्या मुली आहेत गुणी, पण त्यांना वरणारा तशाच योग्यतेचा नसला तर त्याचा घातहि होण्याचा संभव आहे. माझ्या थोरल्या मुलीचें नांव भीष्माचार्यांच्या काळांत इच्छामृति असें होतें आणि त्या दिवसांत तिची प्राप्ति करून घेण्यासाठी सर्वजण झटत असत. त्यानंतर मानवांची जशी अवनति होअूं लागली तशी इच्छामृति प्राप्त करून घेण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा नष्ट होअूं लागली. अलीकडे तर त्यांनी तिला आत्महत्या हें नवीनच नांव दिलें आहे. परीक्षापाखंडाच्या नादाने ज्यांनी विद्यादेवीची अप्रतिष्ठा आरंभिली आहे त्यांच्यापैकी अनेकजण अतो भ्रष्ट स्ततो भ्रष्टः असे होअून केव्हा केव्हा आत्महत्येला वरतात. विद्या आणि परीक्षा यांचें सारखेंच भय वाटणाऱ्यांपैकी कित्येकजण माझी धाकटी मुलगी जी कविता तिला वरतात. तूं जर या दोघींनाहि वरून मला निजात्मजाग्रह-विमुक्त करणार असशील तर आज माझें भाग्यच अुदयास आलें म्हटलें पाहिजे.'

हें अुत्तर अैकून मीं हताशपणाने अुद्गारलों, 'विद्यादेवीच्या प्राप्तीसाठी मी तुझ्या नादीं लागलों आणि आता हेंच का फळ माझ्या तपाला?' तेव्हा माझें सांत्वन करण्याकरिता तो वेताळ म्हणाला, 'हें तर तुझें महद्भाग्य आहे. गुरुजनांच्या साहाय्याने जे विद्यादेवीची आराधना करतात त्यांना ती केवळ आपल्या पित्याच्या सृष्टीचा परिचय करून देते आणि माझ्या साहाय्याने जे तिची आराधना करतात त्यांना ती प्रतिसृष्टिनिर्मितीचें कौशल्य शिकविते. माझ्या मुली या विद्यादेवीच्या मानसकन्याच आहेत. ती स्वतः वंध्या असल्याने तिला आपलें नव-सृष्टीचें कार्य माझ्या कन्यांकडूनच करवावें लागतें. याकरिताच माझ्या साहाय्याने जे तिला प्रसन्न करण्याचा प्रयत्न करतात त्यांच्यांतलेच वर ती या मुलींना मिळवून देण्याचा प्रयत्न करते. पण आमच्या आत्महत्येचे अेक तर ठरलेले विवाहच वारंवार मोडतात, नाही तर मंगला-क्षता पडून विवाह पूर्ण होतांक्षणींच ती विधवा होते. त्यामुळे ती नेहमीच माझ्या घरीं असते. दुसरी कविता ही केव्हा केव्हा आत्महत्येच्या नियोजित वरालाच आयत्यावेळीं पळवून त्याच्याशी गांधर्वविवाह लावते. पुढे कांही दिवसांनी आपल्या स्वच्छंदीपणाने पतीला हास्यास्पद केल्या-नंतर त्याच्याशीं काडीमोड करून परत माहेरीं येते आणि मग अरसिकेषु कवित्वनिवेदनं शिरसि मा लिख मा लिख मा लिख असें म्हणत कवि पुन्हा अेकवार आत्महत्येकडे वळतो. बरें,

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पण या दोघींपैकी कुणाला प्रथम वरण्याचा तुझा विचार आहे?' हा प्रश्न अैकून मीं क्षणभर मनांत विचार केला आणि मनाचा निश्चय करून म्हटलें, 'कुणाला म्हणून काय विचारतोस? First commit suicide and then murder. प्रथम आत्महत्येला वरतों आणि तिच्या तावडींतून जगलोंवांचलोंच तर मग कवितेचा खून करतों. नाही तरी 'नूतन मराठीं'त अिंग्रजीचा खून करण्याची मला सवय झालीच आहे.'

शाळेविषयीचा असावध अुद्गार तोंडांतून निघून गेल्यावर मीं जीभ चावली; कारण 'नूतन मराठी'पेक्षा तिच्या समोरच्या शाळेंत अिंग्रजीचें अध्ययन अधिक चांगलें होतें असा त्या शाळेची अेका काळची विद्यार्थिनी या नात्याने प्रभेला अभिमान वाटत असे. आणि परस्परांच्या शाळांची तुलना हा आमचा नेहमीचाच अेक वादाचा विषय असे. माझा अुद्गार अैकतांच हसत हसत प्रभा म्हणाली, 'Now the cat is out of the bag. अितके दिवस आपल्या शाळेची जी मनसोक्त स्तुति करीत होतास, ती सारी अेका शब्दाबरोबर फुकट गेली ना? अरेरे!'

'आमच्या शाळेंत आम्ही नेहमीच अहं ब्रह्मास्मि या वृत्तीने वागत होतों. आमच्या वर्गांत माझ्या मामाने गणिताच्या तासांत अेकदा तशी मोठ्याने घोषणाहि केली होती. असला साक्षात्कार झालेली जागा या दृष्टीने अजूनसुद्धां आम्हांला त्या शाळेविषयी पूज्यबुद्धि वाटते. तुमच्याप्रमाणे कांही गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुः किंवा गुर्वी ब्रह्मा गुर्वी विष्णुः अशी आमची मनःस्थिति झाली नव्हती.'

'आमच्या शाळेंतल्या बाई गुर्वी असोत नाही तर तन्वी असोत. तो कांही प्रस्तुतचा प्रश्न नाही. आत्महत्येचा आणि कवित्वाचा कांही प्रत्यक्ष संबंध आहे कीं नाही, हाच काय तो आता वादाचा विषय आहे आणि त्याचें बुद्धीला पटेल असें उत्तर कांही तुझ्या कथेंत नाही.'

'कथेंत बुद्धिवाद कसा असणार? पण तुला बुद्धिवादच हवा असला तर मी असें म्हणूं शकेन की ज्या कारणांकरिता आत्महत्या करण्याची प्रवृत्ति होते त्याच कारणांकरिता श्रेष्ठ काव्यरचनेचीहि प्रवृत्ति होते. आत्महत्या कोणत्या कारणांकरिता होतात हें मुलींना चांगलें माहीत असतेंच. तेव्हा तुलाहि तें माहीत असेलच.'

'आधी तुझीं कारणें तर सांग, मग तीं मला माहीत आहेत कीं नाहीत तें सांगेन.'

'आपला विश्वासघात झाल्यानंतर ओढवणाऱ्या संकटांना आणि विटंबनांना तोंड देण्याअितका मनाला आत्मविश्वास अुरला नसला म्हणजे त्यांचें तोंड चुकविण्याकरिता आत्महत्या होतात; नाही तर आपल्यावर झालेल्या अन्यायांचें आणि आपल्या मनोवेदनांचें जगापुढे प्रदर्शन करून आपल्याला अन्यायाने वागविणाऱ्यांची चारचौघांत छीथू व्हावी आणि शक्य तर त्यांच्याहि हृदयांत परिवर्तन व्हावें यासाठी आत्महत्या होतात. हें सारें तुमच्या कवितेच्या पुस्तकांत होतेंच.'

'होय, ती कवितासुद्धा मला आठवते.

> The only art her guilt to cover,
> To hide her shame from every eye,
> To give repentance to her lover
> And wring his bosom is– to die.

आमच्या बाअींना या कवितेची मोठी चीड होती.'

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

'त्या कदाचित् some (women) play the devil and then write a novel या पंथांतल्या असतील. असो. आता यापुढे माझें म्हणणें असें आहे की याच दोन कारणां-मुळे मनाला श्रेष्ठ काव्यरचनेचीहि प्रेरणा होते. पहिल्या Escapism च्या प्रवृत्तीपासून केवळ कल्पनाविलासांत आणि सृष्टिसौंदर्यांत रमणाऱ्या 'फुलराणी'च्या जातीच्या कवितांची निर्मिति होते आणि दुसऱ्या Exhibitionism च्या प्रवृत्तीपासून भावनातरंगांनी मुखरित होणाऱ्या 'राजहंसा'च्या जातीच्या कवितांची निर्मिति होते.'

'याच प्रवृत्तींच्यामुळे काव्यनिर्मिति होते असें जरी क्षणभर मानलें तरी तेवढ्याने ती आत्महत्येच्या प्रयत्नानंतरच होते, किंवा आत्महत्येच्या प्रयत्नांमुळेच होते, असें नाही सिद्ध होत. दुसरें असें की आत्महत्येच्या प्रवृत्तीपासून कांही श्रेष्ठ कवितांची निर्मिति होते असें मानलें तर परहत्येच्या प्रवृत्तीपासून कांही हीन दर्जाच्या कवितांची निर्मिति होते असें मानावें लागेल आणि मग तुझ्या पद्धतीने अनुमानें काढलीं तर भलत्याच भानगडी अुपस्थित होतील. अुदा-हरणार्थ, माधवरावांचें विडंबन करण्यासाटीच अत्र्यांनी आपली 'श्यामला' लिहिली. आता तुझ्या तर्कशास्त्राप्रमाणे त्यावरून असें अनुमान निघेल की अत्र्यांनी माधवरावांची हत्या करण्याच्या प्रयत्नानंतरच ती कविता लिहिली आणि त्यांच्या हत्येच्या प्रयत्नांमुळेच लिहिली.'

'तुझी कल्पना अितकी चांगली आहे की या क्षणीं या बाबतींत स्वतः अत्र्यांचीच भेट घेअून त्यांचें म्हणणें काय आहे तें अैकावेंसें वाटतें. पण तसें करायला गेलों तर आजचें चांदणें वाया जाअील आणि तूं जन्माचा अबोला धरशील. आताच्या तुझ्या आक्षेपाला माझें अुत्तर असें आहे की विडंबनाची कविताहि आत्महत्येच्या प्रवृत्तीपासूनच जन्मास येते. कारण अेखाद्याच्या कवितेचें विडंबन करण्यापूर्वी आपण त्याची कविता आत्मसात् केलेली असावी लागते आणि तिच्याविषयी आपल्या मनांत सकृद्दर्शनीं प्रेम अुद्भवलें तरच ती आत्मसात् होअूं शकते. मग Men love in haste but they detest at leisure या न्यायाने तिचा वीट येअून विडं-बन करण्याची अिच्छा झाली तरी प्रथमदर्शनीं तिला वश झाल्याबद्दल तो आपल्याच मनाचा सूड अुगविणें असतें. आता आत्महत्येच्या प्रवृत्तीपासून कवितेची निर्मिति होते असें अेकदा मानलें की मग ती आत्महत्येच्या प्रयत्नानंतर आणि प्रयत्नामुळेच होते हें मान्य करावेंच लागतें. मेल्याविना स्वर्ग दिसत नाही हें सत्य अगदी बुरणूसबुद्धीच्या माणसांनासुद्धा कळतें. मग मृत्यूची निदान ओळख करून घेतल्यावांचून कवितेचा स्वर्ग कवींना दिसत नाही हें स्वतःसिद्ध सत्य तुझ्यासारख्या तैलबुद्धीच्या विदुषीला कां पटूं नये हेंच मला समजत नाही.'

'अेखादी म्हण म्हणजे कांही युक्लिडचा सिद्धान्त नव्हे की ज्याच्यापासून निघणारे सारे अुपसिद्धान्त मुकाट्याने मीं मान्य करावेत.'

'म्हणीचा पुरावा पुरत नसला तर नुकतीच घडलेली अेक गोष्ट सांगतों. त्या गोष्टीने माझ्या म्हणण्याला दुजोरा मिळतो कीं नाही, तें तूंच पाहा.'

'पण तुझी गोष्ट खरी का खोटी तें कशावरून ठरवावयाचें ?'

'गोष्टींतलीं माणसें अजून जिवंत आहेत. त्यांना समक्ष विचारून ठरवितां येअील. मागे अेकदा मीं तुला अेक मराठी शब्द आणि त्याचा अिंग्रजी अर्थ अेकत्र असलेलें आडनांव शोधण्याचें कोडें घातलें होतें, तें तुला आठवतें का ?'

'न आठवायला काय झालें ? वाट way !'



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

'बरें तर आता गोष्ट अशी आहे की प्रो. वाटव्यांनी मला अेके दिवशीं विचारलें की प्रो. लागूंना त्यांच्या कीर्तीला शोभेल असा ग्रंथ लिहायला लावण्याचा अेखादा अुपाय तुम्हाला माहीत आहे का? मीं अुत्तर दिलें की माहीत नसायला काय झालें? प्रो. लागूंचा कोणींतरी मरणप्राय अपमान केला पाहिजे. माझा अुपाय भयंकर आहे खरा, पण हा अुपाय केल्यानंतर ते जर जगले वांचले तर नक्की अेक अुत्कृष्ट ग्रंथ निर्माण करतील.'

'या अुपायाचा प्रयोग त्यांच्यापेक्षा तुझ्यावरच होण्याचा संभव अधिक आहे, कारण तूं नेहमीच विक्षिप्त वल्लीसारखा वागत असतोस.'

'मुळींच नाही. अपमान केवळ मारामाऱ्या न करणाऱ्या सभ्य गृहस्थांचा होअूं शकतो; माझ्यासारख्या असभ्यांचा होअूं शकत नाही. आणि पुन्हा तूं हें विसरतेस की कवियशःप्रार्थी जनांचा केवळ हृदयभंग होअूं शकतो, मानभंग होअूं शकतच नाही. असो. माझ्या म्हणण्याचा आशय असा की आपल्या बुद्धीला जन्मभर जीवनाचें दास्य करायला लावणें हें आपल्याला किती लाजिरवाणें आहे याची त्यांना कल्पना आली तर कदाचित् ते नवसृष्टीच्या नादाला लागतील.'

'वास्तविक पाहतां त्यांच्यासारखे विद्वान लोक लिहायला धजत नाहीत तोंपर्यंत तुझ्या-सारख्या अडाण्यांनी लेखणीला शिवूं सुद्धा नये. पण म्हणतात ना, **Fools rush in where angels fear to tread.**'

'तुझी ही जुनीपुराणी म्हण अैकून मला अेक नवीन म्हण बनवावीशी वाटते. देवानें काढून घेतली शेपटी म्हणून माणसानें बनविली युनिव्हर्सिटी. पण तो चावटपणा जाअूं दे असले सुप्रसिद्ध विद्वान लिहायला धजत नाहीत याचें कारण काय असावें अशी तुझी कल्पना आहे?'

'विनयामुळे लिहीत नसतील हें मीं मगाशींच सुचविलें नाही का? विद्या विनयेन शोभते'

'माझ्या मतें त्याचें खरें कारण असें आहे की आपल्या बुद्धीला जन्मभर जीवनाचें दास्य करायला लावून त्यांनी तिचा अितका भयंकर अपमान केलेला असतो की तिला त्या दास्यांतून मुक्त केली तर लगेच ती आपला प्राण घेअील अशी त्यांना सारखी धास्ती वाटत असते.'

'मला तर ही तुझी कल्पना सर्वस्वीं निराधार वाटते. अगदी बौद्धबुद्धिरिव निरालंबनीया.'

'अग, अॅरेबियन नाअीट्समधल्या, मांज्यांत भरून समुद्राच्या तळाशीं टाकून दिलेल्या त्या राक्षसानें नव्हती का अशीच प्रतिज्ञा केली की अितःपर जो कोणी मला या बंदिवासांतून मुक्त करील त्याचा मी तत्काळ प्राण घेअीन.'

'खूपच छान आहे तुझा आधार!' प्रभा हसत हसत अुद्गारली. 'अरे हो, मी पण विसर-लेंच होतें की अॅरेबियन नाअीट्स हें तुझें अुपनिषदच आहे.'

'आहेच मुळीं. माझ्याप्रमाणे जर कोणी त्या अुपनिषदाचें मनन करील तर तो अगदी नक्की मोक्षाला जाअील. पण लक्षांत कोण घेतो? बरी आठवण झाली. तुला जर त्या अुपनिष-दांतल्या दृष्टान्तांची टवाळी केल्यावांचून राहवत नसेल तर आता मला अेका अगदी आधुनिक अुपनिषदाचा आधार घेणें भाग आहे.'

'तें कोणतें? अल्लोपनिषद् कीं काय?'

'छे! या क्षणीं चालू असलेलें हें चंद्रप्रभोपनिषद्. मगाशीं अेक भिकार श्लेष करण्याचा मोह न आवरल्यामुळे माझ्याकडून बुद्धीचा अपमान घडला, त्या क्षणीं तूं स्वतःच मला आत्म-

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

हत्या करण्याचा अयाचित अुपदेश केलास. मग हीच कल्पना अितरांच्या अपमान झालेल्या बुद्धीला न सुचण्याअितकी का ती निकामी आहे असें तुला वाटतें ?'

'पण मीं तें केवळ चेष्टेने म्हटलें होतें. माझ्या म्हणण्याचा असा अक्षरशः अर्थ करून आपल्या विक्षिप्त कल्पनांचें समर्थन केलेंस तर तूं आणखी हास्यास्पद होशील अितकेंच.'

'ज्यांना कोणतीहि गोष्ट ठासून सांगण्याचें धैर्य नसतें असे लोक नेहमीच चेष्टेच्या सुरांत बोलून आपला खरा मनोभाव व्यक्त करतात आणि पुन्हा आपल्या म्हणण्याचा तसा अर्थ नव्हता, असें सांगून नामानिराळे होतात. सुसंगत विचार करण्याची सवय नसलेल्या लोकांची ही खोड तुलाहि लागली आहे खरी. मग अुगीच कां तूं खोटें बोलून मला संताप आणतेस ! पुस्तकी विद्वानांना पटतील असले आधार दाखविण्याविषयी तुझा आग्रहच असेल तर शोपेन-हौअेरच्या पुस्तकांतून हवे तितके आधार काढून दाखवितां येतील. बुद्धीच्या अतिरेकाने मानवाला आत्मविस्मृत बनविल्यावांचून आणि आपल्या जीवनाशीं विश्वासघात करायला लावल्या-वांचून कलेची निर्मिति होतच नाही असें त्याने स्पष्ट सांगितलें आहे.'

'पण त्याचे नक्की शब्द तुला आठवताहेत का ?'

'हो, आठवताहेत. To become pure subject of knowledge means to be quit of oneself. The pure subject of knowledge enters in, when one forgets oneself by sinking oneself in the perceived objects so that they alone remain in the consciousness... The intellect which has arisen merely for the service of the Will, and with almost all men remains in that service, in which and in its product its life is consumed, is in all arts and sciences illegitimately used; and in this use is placed the progress and the honour of the human race.'

'अेखाद्या चाकराने आपलीं कामें चुकवून दुसऱ्याचीं कामें करणें आणि आपलीं कामें करण्याअैवजी आपल्याला मारून टाकण्याचाच प्रयत्न करणें, या दोन्हींत किती तरी अंतर आहे असें निदान मला तरी वाटतें.' आपल्या चिकित्सक बुद्धीचा प्रभाव प्रकट करीत प्रभा म्हणाली. 'या विशिष्ट अुदाहरणापुरतेंच बोलायचें तर तुला वाटतें तितकें या दोन्हींत अंतर नाही. आपला चाकर आपलीं कामें चुकवून लोकांचीं कामें करूं लागला म्हणजे त्याचा नि आपला केव्हा ना केव्हा तरी अेखादा चांगला खटका अुडतोच. आपली बुद्धि ही जीवनाची सेवा चुकवून कलेची सेवा करूं लागली म्हणजे तिचा आणि जीवनाचा अेकदा चांगला खटका अुडाल्यावांचून राहत नाही. तेव्हा आत्महत्येचा प्रयत्न घडल्यावांचून किंवा केल्यावांचून कवि-त्वाचा बातिस्मा मिळत नाही, ही माझी कल्पना शोपेनहौअेरच्या विवेचनाशीं सुसंगतच आहे.'

'हें सारें तर्कट अैकून मला अितकेंच वाटतें की there is a method in your madness. कारण बुद्धीने जीवनाकडे दुर्लक्ष्य केलें तर असें काय मोठें स्थित्यंतर घडून येतें की ज्यामुळे आपल्याला आत्महत्यासुद्धा श्रेयस्कर वाटावी ?'

'आपल्या बुद्धीने जीवनाकडे पाठ केली की आपल्याला अितर लोकांच्या चांगुलपणाच्या विश्वासावर जगावें लागतें. बालपणीं आपण या विश्वासाच्या क्षणिक स्वर्गांत विहार करीत असतों, तेव्हा आपल्याला विश्वासघातरूपी सैतानाच्या अस्तित्वाची जाणीवहि नसते. पुढे प्रथमयौवनांत जेव्हा विश्वासघाताचा पहिला दारुण आघात आपल्या हृदयावर होतो, सैतानाच्या अस्तित्वाचा पहिला भयानक अनुभव येअून आपली भावना स्तिमित होते आणि आपल्या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

भयचकित दृष्टीला सारें जगच जेव्हा सैतानी दिसायला लागतें, तेव्हा आपल्या अननुभवी तरुण मनाला जगाच्या सांसर्गिक पापापासून अलिप्त राहण्याचा आत्महत्येवांचून दुसरा मार्गच दिसत नाही. असली आत्यंतिक निराशेची काळरात्र प्रत्येक श्रेष्ठ कवीच्या जीवनांत येतेच येते; आणि त्यानंतरच त्याची श्रेष्ठ कविता निर्माण होते.'

'जग पापी आहे म्हणून आपण जीव दिला पाहिजे हें तर्कशास्त्र अगदी अद्‌भुत आहे खरें!'

'कवींचें तर्कशास्त्र असेंच असायचें. पण सकृद्दर्शनीं अद्‌भुत दिसलें तरी सामान्य लोकांच्या भावनेच्या दृष्टीनेहि तें सुसंगतच आहे.'

'तें कसें?'

'प्रत्येक व्यक्तीच्या अनुभवांचें जग हें त्याच्या निकटच्या स्वजनांपुरतेंच मर्यादित असतें. अुदाहरणार्थ, जगांत नित्य लक्षावधि लोक मरत असतात, पण आपल्या जिव्हाळ्याच्या व्यक्तींपैकी कोणी यमलोकीं गेलें तरच आपल्याला यमराजांचें अस्तित्व जाणवतें. त्याप्रमाणेच स्वजनांचें विश्वासघाताचें पाप आपल्या अनुभवाला आलें तरच आपल्याला त्या पापाचें अस्तित्व जाणवूं लागतें. मग 'अपापानां कुले जाते, मयि पापं न विद्यते' हा अहंकार नष्ट होतो आणि हॅम्लेटप्रमाणे आपल्यालाहि वाटूं लागतें, We are arrant knaves, all; believe none of us. अशी अेकदा मनाची भावना झाली की To be or not to be हा हॅम्लेटचा प्रश्न आपल्याहि अंतःकरणांत थैमान घालूं लागतो.'

'तुझें बोलणें अैकून मला वाटायला लागलें आहे की कवि बनण्याच्या अैवजी तूं हॅम्लेटसारखा सिनिक मात्र लौकर बनशील, किंवा आताच बनला आहेस. प्रत्येक श्रेष्ठ कवीचा त्याच्या निकटच्या स्वजनांकडून विश्वासघात झाला असला पाहिजे ही तुझी कल्पना तुझी तुला तरी खरी वाटती का रे?'

'On n'est jamais trahi que par les siens (केवळ निकटच्या स्वजनांकडूनच आपला विश्वासघात होअूं शकतो) ही अतिपरिचित फ्रेंच म्हण तूं इतक्यांत विसरलीस कशी? निदान ब्लेकची कविता तरी तुला आठवायला पाहिजे होती,

> A man's worst enemies are those,
> Of his own house and family.

ही वस्तुस्थिति नुसती कानाने अैकून तुला इतका धक्का बसला, तर मग ज्यांना आपल्या जीवनाच्या पूर्वरंगांत या भयंकर सत्याचा अनुभव घ्यावा लागला त्यांची अवस्था काय झाली असेल याची तूं स्वतःच कल्पना कर.'

'पण जगांत अेका हाताने कांही टाळी वाजत नाही तेव्हा त्यांच्या विश्वासघाताला ते स्वतः कांही अंशीं तरी कारणीभूत झाले असलेच पाहिजेत.'

'नाही ग. बये, त्या हतभाग्यांचा अपराध इतकाच असतो की सामान्य जनांपेक्षा त्यांना अधिक बुद्धि लाभली असल्याने तिला केवळ स्वार्थाच्या जाळ्यांत गुंतवून ठेवणें त्यांना अशक्य होतें. मग प्रयोजनमनुद्दिश्य न मंदोऽपि प्रवर्तते या सूत्राला अनुसरून त्यांचें वर्तन नसल्यामुळे त्यांचे स्वजन त्यांना वेडे ठरवितात आणि निःशंकपणाने त्यांचा विश्वासघात करतात. आणि वर विचारतात काय तर आम्ही सगळेजण वाअीट आणि तूं अेकटाच चांगला वाटतें!

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कांहीं अंशीं आपण स्वतःच जीवनाकडे दुर्लक्ष करण्याचा हा दुष्परिणाम असतो हें खरें. वेर्टेरने म्हटलेंच आहे, 'He who betrays himself finds himself betrayed by every one else'. पण खरोखरीचा अपराध कांही त्यांच्याकडून घडलेला नसतो. यामुळेच पापाचा संसर्ग लागण्यापूर्वींच प्राणत्याग करावा, असें त्यांना वाटतें आणि आपल्या पापी शत्रूंच्या संसर्गाने विटाळलेलें जीवित झिडकारून टाकल्यानंतर जर ते जिवंत राहिले, तर ते केवळ नवसृष्टीच्या प्रेरणेनेच जिवंत राहतात.'

'नुसत्या जीवनकलहांतच नव्हे, तर आत्महत्येंतसुद्धा अयशस्वी होणाऱ्या रड्यांच्या हातून नवसृष्टीची रचना होणार? या कठोर जगाची नवी घडी बसविण्याचें कार्य होणार? ही कल्पनाच मला हास्यास्पद वाटते.'

'आपल्या चंद्रप्रभा नांवाचा तुला अितका अभिमान वाटतो! निदान त्याकरिता तरी तुला ही कल्पना हास्यास्पद वाटूं नये. प्रभे, या पापी पृथ्वीचा संपर्क टाळण्यासाठी आत्महत्येचा प्रयत्न करून आकाशांत गेलेल्या चंद्रानेच नाही का अिथल्या काळरात्रीचें स्वरूप संपूर्णपणें पालटून टाकलें?'

'असल्या महत्त्वाच्या आक्षेपांचें निरसन नुसत्या रूपकांनी करायला लागलास तर चंद्राच्या लाटिन नांवावरून निघालेलें तें सुप्रसिद्ध विशेषण मलासुद्धा तुला लावावें लागेल.'

'चंद्रापासून निघणारीं विशेषणें चंद्रप्रभेने लावायचीं नाहीत तर लावायचीं कुणीं? बरें पण तो प्रश्न राहूं दे. आत्महत्येचा प्रयत्न फसला तर त्याचा परिणाम क्रांतिकारक होण्याचा संभव असतो हें सिद्ध करायला रूपकाचा पुरावा पुरत नसला तर थोडा अैतिहासिक पुरावा देतों. प्राचीन ग्रीसमधल्या दोन नगरराष्ट्रांमध्ये आत्महत्येचें कारण सांगणाऱ्यांना सरकारकडून विष पुरविण्याची व्यवस्था केलेली होती. त्या ग्रीक नगरांच्यासारखी सुव्यवस्था आपल्या देशांत असती तर लॉर्ड क्लाअीव्ह मद्रासमध्ये आत्महत्येंत अयशस्वी झालाच नसता आणि आपल्या देशांत अिंग्रजी राज्यहि कदाचित् प्रस्थापित झालें नसतें.'

'कृपा करून माझ्यापुढे तूं आपल्या अैतिहासिक ज्ञानाचें प्रदर्शन करूं नकोस. अितिहासाचें नांव अैकलें की मला अिलियटच्या 'Hollow Men' ची आठवण होते.

'तर मग जी कल्पना तुझ्याजवळसुद्धा कधी बोलून दाखवूं नये असें मला वाटत होतें ती बोलल्यावांचून गत्यंतर नाही असें दिसतें. स्वतः अीश्वराला आपल्या सृष्टीचा वीट आला म्हणजे तोसुद्धा आत्महत्या करण्याचा प्रयत्न करतो आणि हा त्याचा प्रयत्न फसला म्हणजेच तो या सृष्टीची पुनर्रचना करण्याला समर्थ होतो.'

'आता मात्र मला स्वतःला चिमटा घेअून पाहिलें पाहिजे की मी स्वप्नांत आहे का तुला खरोखरीचें वेड लागलें आहे!'

'चिमटा घ्यायचाच असला तर निदान रक्त येणार नाही अशा बेताने घे, म्हणजे घरीं गेल्यावर त्याचें कारण तरी सांगावें लागणार नाही. अीश्वराने आपल्या आत्महत्येच्या प्रयत्नानेच सैतान अुत्पन्न केला आहे आणि सैतानाच्या अुत्पत्तीपासूनच ही सृष्टि अधिकाधिक सुंदर व्हायला लागली आहे.'

'अितक्यांत तूं विश्वासघातकी सैतानी स्वजनांवर तोंडसुख घेत होतास आणि आता



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

म्हणतोस की सैतानाच्या अुत्पत्तीपासूनच ही सृष्टि अधिकाधिक सुंदर व्हायला लागली आहे, या तुझ्या बोलण्यांत तुला विसंगति नाही दिसत ?'

'यांत विसंगति कसली ? सैतानाच्या अुत्पत्तीपासून आपलें जीवन दुष्कर होत चाललें असलें तरी सृष्टि अधिकाधिक सुंदरच होत चालली आहे. तूंच विचार करून बघ की सैतानाच्या म्हणजे आगरकरांच्या सांगण्याप्रमाणे तुम्हीं मुलींनी ज्ञानवृक्षाचें फळ चाखल्यापासून तुमचें जीवन सुकर झालें आहे का दुष्कर झालें आहे आणि तुमचें सौंदर्य अधिक झालें आहे का अुणें झालें आहे ? वाटलें तर अेकदा आगरकरवसतिगृहांत तुझ्या मैत्रिणींच्या बरोबर याविषयी सविस्तर चर्चा करून मग मला तुमचें अधिकृत मत सांग.'

'पण आमचा मुळीं अीश्वर आणि सैतान यांच्या अस्तित्वावरच विश्वास नाही. तेव्हा आमच्यांत असले अचरट वाद व्हायचेच नाहीत.'

'मला अेक गोष्ट सांग प्रभे, सौंदर्यावर तुमचा विश्वास आहे का नाही ?'

'हें काय विचारतोस ? सौंदर्य तर आमचें Raison d'etre आहे.'

'मग सौंदर्यावर विश्वास ठेवणाऱ्यांनी अीश्वर आणि सैतान यांच्याविषयी अविश्वास बाळगूं नये.'

'तें कां ?'

'सौंदर्य हें नेहमी विषमतायुक्त असतें आणि असुंदरपणा हा नेहमी सपाट असतो. अिंग्रजींत रूपहीन मुलींना plain म्हणतात हें तुला ठाअुक आहेच. मग हा शरीरसौंदर्याचा नियम तूं मनोजगताला कां लावीत नाहीस ? ज्यांचा अीश्वर आणि सैतान यांच्यावर विश्वासच नसतो त्यांचें मनोजगत् अगदी 'अजातशत्रु' केळकरांच्या मनोजगताप्रमाणे सपशेल सपाट असलेलें तुला आढळून येअील. केळकरांच्या व्युत्पत्तीच्या वेळींच ही कल्पना मला प्रथम सुचली, म्हणून तुला मी त्यांचेंच अुदाहरण देत आहें, अितकेंच.'

'तूं कांहीहि म्हण. पण प्रत्येक नागरजनाने जीवनाचा अुपभोग कसा घ्यावा, आपलें जीवन कसें सफळ करावें, हें त्यांच्यापासून शिकण्याजोगें आहे.'

'जन्मभर जीवनाचें दास्य करणें हेंच ज्यांचें जीवनसर्वस्व असेल त्यांनी हवें तर त्यांचें अनुकरण करावें. पण असल्या जीवनाचें माहात्म्य कोणी सांगायला लागलें की मला अेका फ्रेंच लेखकाची आठवण होते. तो चक्रम् नेहमी म्हणत असे As for living, our servants can do that for us.'

'तूंच असा केळकरांच्यावर टीका करायला लागलास म्हणजे माझासुद्धा सैतानाच्या अस्तित्वावर विश्वास बसतो खरा !' पहिल्या शब्दावर जोर देअून स्मित करीत प्रभा म्हणाली. 'पण त्यापेक्षाहि द्राक्षें आंबट म्हणून सांगणाऱ्या कोल्ह्याच्या कथेवर अधिक विश्वास बसतो.'

'त्या गोष्टीसंबंधी माझें तर असें निश्चित मत आहे की प्रत्येक सुसंस्कृत व्यक्तीने ती गोष्ट विसरून जावी. यश आणि सुख यांचीं जीं आंबट द्राक्षें या जीवनांत लाभूं शकतात त्यांचा मला मनापासून वीट आहे. कारण आपण मेलों आणि जग बुडालें अशा वृत्तीचीं माणसेंच त्यांच्या नादीं लागूं शकतात. सुखी आणि यशस्वी राष्ट्रांत कधी अविस्मरणीय अितिहास निर्माण झाला आहे, का सुखी आणि यशस्वी जीवनांत कधी अविस्मरणीय काव्य निर्माण झालें आहे ? आपल्या आयुष्याच्या अुत्तरार्धांत दुःख, दारिद्र्य आणि अपयश यांचें



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

सारे सोहाळे मिल्टनने अनुभवले. पण त्यामुळेच तो समकालीन जीवनाच्या दास्यांतून मुक्त झाला आणि मगच त्याने स्वर्गभ्रष्ट सैतानाचें अविस्मरणीय चरित्र लिहिलें. मिल्टनची आठवण झाली की मला नेहमी मारवीचा अेक अुत्कृष्ट श्लोक आठवतो :

स्पृहणीयगुणैर्महात्मभिश्चरिते वर्त्मनि यच्छतां मनः ॥
विधिहेतुरहेतुरागसां विनिपातोऽपि समः समुन्नतेः ॥१॥

ज्या विनिपातामुळे वैयक्तिक आणि समकालीन जीवनाच्या दास्यांतून मुक्तता होअून अीश्वर आणि सैतान यांच्या विराट् विरोधाचें वास्तविक स्वरूप व्यक्त करण्याअितकी कवीची मानसिक शक्ति वृद्धिंगत होत असेल, तो विनिपात नसून ती त्याची खरोखरीची समुन्नतिच आहे. किंवा अचिंत्य शक्तींचा परिचय करून घेण्याचा तोच अेक मार्ग मानवांना मोकळा आहे. गोअेटेने म्हटलेंच आहे,

Wer nie sein Brot mit Tränen ass,
Wer nie die Kummervollen Nächte
Auf seinem Bette weinend sass,
Der kennt euch nicht, ihr himmlischen Mächte.

म्हणजे ज्याला कधी अश्रूंनी भिजलेली भाकर खावी लागली नाही, किंवा अंथरुणावर शोक करीत बसून रात्रीमागून रात्री दुःखांत कंठाव्या लागल्या नाहीत, त्याला, हे स्वर्गस्थ देवतांनो, तुमचा परिचय होअूं शकत नाही.'

'तुझें हें सारें बोलणें अैकून मला तर असें वाटतें की दुःखवादी लोकांनीच प्रथम देवाची कल्पना केली आणि त्याकरिता त्या दुःखवाद्यांना अधिकाधिक दुःखें देअून तो त्यांचें ऋण फेडीत असतो. मिल्टनचें अंतिम जीवन म्हणजे जिवंत मरण बनण्याचें हेंच खरें कारण असावें अशी मला शंका येते.'

'तुझी कल्पना छान आहे. पण ही कल्पना करतांना अेका गोष्टीचा तुला विसर पडला आहे. केवळ अीश्वरावरील विश्वासानेच संकटांची वृद्धि होते असें नाही. सौंदर्यावरील विश्वासाने आणि भक्तीनेहि तोच प्रकार घडून येतो. अेखाद्या व्यक्तीला देहाचें सौंदर्य लाभलें असलें तर दुसऱ्यांचे प्राण संकटांत पडतात आणि मनाचें सौंदर्य लाभलें असलें तर तिचेच प्राण संकटांत पडतात. पण त्यामुळे कालिदासाच्या सिद्धान्ताचीच सत्यता मनाला पटते. मरणं प्रकृतिः शरीरिणां विकृतिर्जीवितमुच्यते बुधैः. जीवित म्हणजे आपलें वैयक्तिक जीवन ही विकृति असल्यामुळे असुख आणि अपयश यांच्या अनुभवाने त्या विकृतीचा मोह दूर होण्याला साहाय्य होतें. हा मोह नष्ट झाल्यावर मनाला कळून येतें की जीवनार्थ केवळ कलह असूं शकतो, कला असूं शकत नाही. कला आणि सौंदर्य हीं केवळ मृत्यूकरिताच असूं शकतात. नीत्झेने सागितलेंच आहे, Art is the will to overcome becoming, it is a process of eternalising. या सूत्राची चिकित्सा केली असतां असें स्पष्ट दिसून येतें की कला ही क्षणिकाची, व्यक्ताची आणि जीविताची अुपासना नसून चिरंतनाची, अव्यक्ताची आणि मृत्यूची अुपासना आहे. व्यक्ताला अव्यक्ताच्या सेवेला लावणें हेंच प्रत्येक प्रतिभावंताचें कार्य असतें.'

'आता तूं वाहवायला लागलास आणि तुझें बोलणें अैकून मलाहि कसेंसेंच वाटायला



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

लागलें आहे. पण असले वेडेवाकडे विचार तूं आपल्या डोक्यांत घोळवीत असतोस त्याचें तुला भय नाही वाटत ?'

'तुझ्या दर्शनापासूनच डर तो पीछे रहीं अशी माझी भावना होअून बसली आहे. कारण स्वर्गीय सौंदर्याचें दर्शन घेणारा मनुष्य केव्हा मृत्यूच्या आहारीं जाअील याचा नेम नसतो. अेका जर्मन कवीने हीच भावना त्याच्या भाषेंत व्यक्त केली आहे.

Wer die Shoenheit angeschaut mit Augen
Ist dem Tode shon anheimgegeben.'

'तूं मृत्यूचीच अुपासना करीत असतोस तर मृत्यूपासून तुला आताच भय नाही हें अुघड आहे. पण तुझे हे सारे विचार असामाजिक, निदान समाजाच्या विचारांच्या अुलट तरी, आहेत. तेव्हा समाजापासून अुपद्रव होण्याचें तुला भय नाही वाटत ?'

'पण तो अुपद्रव मी लहानपणापासून सोसत आलों आहें आणि पुढेहि तो असाच सोसावा लागेल, हें अुघड आहे. माझ्यासारखाच A.J. असलेला टॉयनबी म्हणतो, If the creative genius fails to bring about in his milieu the mutation which he has achieved in himself, his creativeness will be fatal to him. He will have put himself out of gear with his field of action; and in loosing the power of action he will loose the will to live— even if his former fellows do not harry him to death. This is the penalty of the genius whose failure to transform his social milieu convicts him of having been before his time.'

---



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# महाराष्ट्रांतील जानपद ओवी

(लेखांक ५ वा)

(लेखिका— कु. **अनसूया भागवत**)

सामाजिक व कौटुंबिक जीवनावरील ओव्यांमध्ये सर्वांत महत्त्वाचा विभाग म्हणजे भावनात्मक ओव्यांचा. जात्याजवळ बसल्यानंतर समोर दिसतील त्या अथवा स्मृतिपटलावर येतील त्या वस्तु, कल्पना व माणसें यांवर झटकन् ओव्या रचल्या जातात. अर्थात् अशा वेळीं आपल्या कुटुंबांतील व कुटुंबाबाहेरील जवळच्या समाजांतील निरनिराळीं माणसें हा गाणाऱ्या स्त्रीला सर्वांत अधिक आकर्षक विषय वाटल्यास त्यांत नवल नाहीं. म्हणूनच निरनिराळ्या सुचलेल्या कल्पनांची सांगड योग्य रीतीने निरनिराळ्या नातलग मंडळींच्या किंवा परिचित माणसांच्या नांवांशीं घातली जाते व त्यांच्या नांवांवरून त्या ओव्या गाअिल्या जातात. यामुळेच पुष्कळदा तिसरा किंवा चौथा चरण त्या माणसाच्या नांवाने किंवा संबंधवाचक शब्दाने करून ओवी पुरी करतात.

अशा तऱ्हेच्या ओव्यांतून निरनिराळ्या नातलगांच्या परस्परविषयक भावना हा जरी सर्वांत अुठावदार मुद्दा असला तरी त्याबरोबर पार्श्वभूमीला घेतलेलें खेडेगांवांतील विशिष्ट जीवन, पिढ्यानुपिढ्या चालत आलेल्या अशिक्षित लोकांमधील कल्पना व समजुती आणि रूढीने पडून गेलेल्या चालीरीति या सर्वांचा त्यांमधून अभ्यास करायला मिळतो म्हणूनच सामाजिक दृष्ट्या या ओव्यांचें महत्त्व फार आहे.

या भावनात्मक ओव्यांचें खालीलप्रमाणे वर्गीकरण केलें आहे—

(१) मातृ-पितृप्रेम, (२) वात्सल्य, (३) बहीण-भाअूप्रेम, (४) पति पत्नीप्रेम, (५) अितर नातलगांबद्दलच्या भावना, (६) शेजारणींविषयी भावना, (७) मैत्री.

**(१) मातृ-पितृ प्रेम**— हिंदु धर्मशास्त्रांत ठिकठिकाणीं आअीबापांची थोरवी वर्णिलेली आहे. आअीबापांबद्दलच्या भावना व्यक्त करणाऱ्या खालील ओव्यांत तीच थोरवी गाअिलेली आढळून येते. हिंदूंची पितृऋणाची कल्पना ५४६ या ओवीमध्ये स्पष्टपणें दिसून येते. आअी-बापांनी जन्म दिला म्हणूनच आपल्याला हें जग पाहण्यास सांपडलें असें म्हणून गाणारी स्त्री आअीबापांसंबंधीचें आपलें ऋण मान्य करते. आअीबापांची तुलना निसर्गांतील पवित्र गोष्टींशीं केल्यामुळे या भावनांतील अुच्चत्व सिद्ध झालेलें आहे. त्यांतूनहि पित्याबद्दलचा आदर व्यक्त करतांना त्याचें साधर्म्य अेखादा मोठा पर्वत किंवा विस्तृत छाया देणारा पवित्र वटवृक्ष या-सारख्या भव्य वस्तूंशीं दाखविलेलें आहे. याअुलट आअीची तुलना गोड दूध देणारें नारळीचें झाड, करवंद किंवा गोधन यांसारखी चिकाळ फळांचीं झाडें किंवा लहानसेंच परंतु पवित्र असें तुळशीचें रोप यांच्याबरोबर केल्याने तिच्याबद्दलच्या प्रेमांतील स्निग्धपणा व्यक्त झालेला आहे.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

काशीच्या पलीकड नांव नदीचं गया[1] ।
शंबर गोतांमधीं आपरूक[2] बाबाबयां[3] ॥५४४॥
समिंदराच्या पल्याल अंबूजंबूचीं[4] दोन बेटं ।
बाबाबयाचा माझ्या सौदा सांपडना कोठं ॥
काशी काशी म्हणूं काशी कोणीं ती पाहिली ?
बयाबाबाओंनी मला दुनिया दाविली ॥५४६॥
पिता माझा वड बया माझी करवंद[5] ।
काशीला जाते वाट दोन्ही झाडांच्या मधून[6] ॥
पिता माझा बाजी काशीचे बेलरूपी ।
गंधारी माझी गोदू[7] विष्णुपदाची तुळशी ॥५४८
अेवढा माझा पिंडु बयाबाबाच्या कडरवांदीं ।
पिता माझा वड बया वडाची वडफांदी ॥५४९
चंदन मौलागिरी[8] नांव माझ्या पित्याओचं ।
असं गोड दुधु बया माझ्या नारळीचं ॥५५०
पोटीचीं बाळं पपओचीं फळं ।
बया माझा बाजी दोन्ही अमृताचीं केळं ॥
हौस मला मोटी बहिणीभावंडं जेवायाचीं ।
बया माझा बाजी दोन्ही ताटं शेवयाचीं ॥
पिता माझा पितांबर बया माझी लाल[9] साडी ।
बहीण पाटवाची घडी बंधु सावणाची वडी[10] ॥
जवर बाबाबया तवर लळा ।
असा शोभा देतो बारवाखाली मळा ॥५५४॥
अेकामागं अेक कोण दुपारचीं दोघं ।
मालणी[11] झाली बया गिरिजा शंकराच्या मागं ॥
पिता पिता म्हणूं काशीचा खांब हाल ।
बयाचं नांव घेतां जहाज दर्यांत चाले[12] ॥५५६

आओ व बाप या दोघांबद्दलहि अशा तऱ्हेने सारखाच आदर असला तरी आओ-बद्दलच्या भावना केव्हाहि जास्त आपलेपणाच्या असतात. पित्यापेक्षा आणि पत्नीपेक्षाहि मातेची थोरवी अधिक आहे अशी कल्पना खालील ओव्यांतून दिसून येते—

१ गया हें स्थलाचें नांव या ठिकाणीं गंगा नदीला लावलेलें दिसतें. या ओवीची २ री ओळ "गंधारी माझी गोदू चल तीर्थाला जाऊं बया" अशीहि मिळते.

२ अपरूप.

३ ग्रामगीतांतून आओचा अुल्लेख पुष्कळदा "बया" या शब्दाने केलेला असतो.

४ जंबुद्वीप म्हणजे हिंदुस्थान. परंतु 'अंबू' बेट मात्र केवळ काल्पनिक. छंद साधण्याकरिता व तुलनेंतील दोन गोष्टींची कल्पना पूर्ण करण्याकरिता हें 'अंबू बेट' शोधून काढलेलें दिसतें.

५ 'करवंद' याअैवजी "गोधन" असाहि शब्दप्रयोग आढळतो.

६ आओबापांची सेवा केल्याने काशीला गेल्याचें पुण्य घडतें ही जी हिंदूंची सार्वत्रिक कल्पना ती या ठिकाणीं मोठ्या सुंदर रीतीने श्लेष साधून व्यक्त केलेली आहे.

७ आओबद्दल "गंधारी गोदू" हा शब्दप्रयोग ओवीगीतांतून नेहमी आढळतो. गंधारी ही शंभर पुत्रांची माता होती म्हणूनच आओची तुलना गौरवाने तिच्याशीं केलेली असावी. आणि गोदावरी नदी महाराष्ट्राला गंगेअितकीच पवित्र तेव्हा आओला "गोदू" म्हणून संबोधणें स्वाभाविकच आहे. त्याचप्रमाणे "बाजी" हा पित्याबद्दल अुपयोजिलेला शब्द त्याचें सामर्थ्य दर्शवतो.

८ मलयगिरी.

९ साधारणतः लाल रंग शुभ समजला जातो. महाराष्ट्रीय स्त्रियांत लाल रंगाची साडी फार प्रिय आहे.

१० किंवाः— "पिता पिता म्हणूं पिता माझा पितांबर ।
बया माझी साडीचोळी
माझा बंधुराया माझा ठेवणीचा मोतीचूर ॥" (मोतीचूर लुगडें)

११ मालण म्हणजे सुंदर स्त्री. आओबद्दल किंवा मुलीबद्दल हा शब्दप्रयोग या गीतांतून नेहमी आढळतो.

१२ पित्याचें नांव घेतलें म्हणजे आओचें (काशीचें) हृदय हलतें व आओचें नांव घेतलें असतां माझें हृदयरूपी जहाज माझ्या अश्रूरूपी दर्यांत चालतें असें स्पष्टीकरण गाणाऱ्या स्त्रीने केलें.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

बया बया म्हणूं बया साखरेची लाही ।
प्रिथीम धुंडल्यानं तिच्यासारखी माया नाही ॥
दिवस मावळला सावली गेली टेकाला ।
गंधारीवांचून माया येअीना लोकाला ॥५५८॥
चैताच्या महिन्यांत चैतीपालव फुटली ।
मावलीवांचून दुसऱ्या गोताला अितकी माया कोटली ? ॥५५९॥
शंवर माझं गोत समदी वनींचं बाभुळं[1] ।
माअूलीच्या माझ्या अंतरीं पराण येगळ ॥
बया बया म्हणूं बया कुणीच होअीना ।
बयाअीची सर शेजी नारीला येअीना ॥५६१॥
अग बया ग बया म्हणूं मावच्यां[2] बया किती ।
जन्म दिलेली भागिरथी ॥५६२॥
बया न बया म्हणूं बया केवढी जिन्नस ?
चांदीच्या जोडव्याला नाहीं लागत कानस ॥
बया बया म्हणूं अितुकं काय गोड ।
मळ्याच्या मळ्यामधीं खडीसाखरेचं झाडं[3] ॥
बया म्हणूं बया जसं साखरेचं पोतं ।
गोड म्हणुनि येताजाताअी केलं रितं[4] ॥५६५
बया बया म्हणूं तोंडीं सुटलं पाझर ।
गंधारी माझी गोदु माझी मधाची घागर ॥
बयां बया म्हणूं तोंडाला पडली मिटी ।
गंधारी माझी बया साखर माझी पिठी[5] ॥५६७
बया बया म्हणूं बया साखरेचा खडा ।
विसरुनि गेला पिता माझा दूधपेडा ॥५६८॥
बया बया म्हणूं बया अमसुलाचं[6] पान ।
वहातें तुझी आण देही माझी येअिमानं[7] ॥
आअीवरी शिव्या नको देअूं गिन्यानवंता ।
पोथीपुस्तकांत आर्धी येते तुझी माता ॥५७०
काशी खंडाअीच्या काशीला दोन नांवं ।
अेकीचं पाणी प्यावं अेकीच्या पोटीं यावं[9] ॥
जन्म दिलेल्या नारीला नको म्हणूं केंगामेति[8] ।
तुझ्या जलमाच्या येळीं तुझी अस्तुरी कुठं होती ॥५७२॥
अेवढा माझा पिंडु माझ्या पित्याने पैदा केला ।
माझ्या जलमाच्यायेळीं आअी माझीया जड गेला
जलम देअुनि पिता झाला निरधारी ।
गंधाऱ्या गोदूला देवकीला कष्ट भारी ॥५७४॥
अेवढा माझा पिंडु पित्या बाजींच्या मासाचा ।
बयाच्या सायासाचा शिरीं झुंबडा केसांचों[10] ॥
केलास अुपकार माझे अुपकाराचे साळु ।
मांडीवर घेअूनी बया माझी भरते टाळु ॥५७६
मावलीची माया सर्व्या बाळावरी ।
चिमणी कोट करी जाअीच्या कळ्यावरी ॥५७७

---

१ ओवीगीतांतून बाभळीच्या झाडाची अुपमा नेहमी कांहींतरी अनिष्ट गोष्ट सूचित करण्याकरिता अुपयोगीं आणतात. याच्या अुलट बोरीचें झाड कांटेरी असूनहि त्याच्या गोड फळांमुळेच कीं काय अत्यंत सालसपणाचें अुपमान म्हणून त्याचा अुल्लेख करतात. (ओवी ५८४ पाहा.)

२ मायेच्या.

३ किंवा— "बया बया म्हणूं अितकं गोड काय ?
खडीसाखरेची लाह्य ॥"

४ गोड म्हणून येतांजातांना वाटेल त्याने त्याचा अुपभोग घ्यावा येवढाच अर्थ.

५ किंवा— "बया बया म्हणूं माझ्या ओठाची झाली मिठी ।
माझी साखर लाही पिठी ॥"

६ आमसोलाच्या फुलाला ज्याप्रमाणे पुष्कळ केसर असतात त्याप्रमाणे आअीला १८ धारा (?) दूध असतें असें स्पष्टीकरण गाणाऱ्या स्त्रीने केलें.

७ ज्याच्या नांवाने शपथ घ्यायची त्याच्या जीवाला ती वाअीट असते अशी समजूत आहे.
किंवा— "बया बया म्हणूं बया केवड्याचं पान ।
वेडा माझा जीव तुझ्या गळ्याची वहातो आण ॥"

८ गंगा व आअी. ९ वेडी.

१० किंवा दुसरी ओळ:— "बयान केलं ओझं शिरीं बुचडा केसाचा ॥"

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

स्वतःच्या आअीवरून गाअिलेल्या खालील प्रकारच्या आणखी सामान्य ओव्याहि मिळतात--

नको नारी म्हणूं माझ्या बयाला ओंगळ ।
बया माझी बाअी ती केळी मी कंबळं[1] ॥५७८

बया बया म्हणूं सुकुनी गेल माझ ओठ ।
सर्गी बयाबाअी सपनीं द्यावी भेट ॥५७९॥

शृंगारलीं ताटं वर अुटीलीं पाची बोटं[2] ।
गंधारी माझी बया जेअूं वाढुनि गेली कुठं ? ॥

सुनेला सासुरवास जिला आला तिन केला ।
माझ्या बयाचा भोळेपणांत जल्म गेला ॥५८१

धोबीण धुणं धुती पाणी पाडुनि नीचाळ ।
माझ्या मालणबयाचं पतीव्रताचं पातळ ॥५८२

भरल्या बाजारांत काया पुरना माझी अंग ।
माझी ती गोदाबाअी कोणत्या गल्लीं गेली ती सांग

विशेषेकरून मुलीच्या जीवनांत तर आअीचें स्थान अधिकच महत्त्वाचें असतें. मुलापेक्षाहि मुलीला आअीबद्दल जो अत्यंत जिव्हाळा वाटतो तो खालील ओव्यांतून आर्ततेने व्यक्त झालेला आहे. अेकीला दुःख झालें की दुसरीला तें किती बोचतें याचें हृदयस्पर्शी चित्र या ओव्यांत आहे—

बाभळीशेजारीं झाड बोरीचं नसावं ।
बयानं शिकवीलं गरतीशेजारीं बसावं ॥५८४॥

आअीला नाही वळं[3] लेकीला कुठुनी ?
ओसरीचा तांब्या दिला पायान लोटुनी ॥

जाती ग साठीं माती माती खातें मी मूटमूठी ।
भल्या गरतीची आहे लेक मायबापांच्या नांवा साठीं ॥५८६॥

जाअीन सभतून सभवाल्याची बहीण ।
मालण माझी बया तुझा कुसवा गहीण[4] ॥५८७

बया घाली न्हाअूं पाणी मोरींत दाटलं ।
जिला नाही लेक तिला नवल वाटलं[5] ॥५८८

बया घाली न्हाअूं न्हाण्याचं झालं तळं ।
माझ्या बंधवाला धरण बांधता गेला येळ ॥

गुज बोलाअीला मायलेकीचं गुज गोड ।
मावळाया गेली चांदणी सोप्याआड[6] ॥५९०॥

गुज बोलाअीला गुजाचा झाला झाडा ।
वाणींचा माझा बाळ चंद्र धडीन अुगवलीं ॥

काळी चंद्रकळा सणासुधीला नेसावी ।
बया माझी बाअी जल्माभाऱ्याला असावी ॥

सुख सांगतांनी दुःखाची झाली सअी ।
आता माझी बाअी नीजली जागी होअी[7] ॥

येडा माझा जीअू नको वाऱ्याच्या मागं लागूं ।
गंधारी माझी गोदू धीराच्या गोष्टी सांगू ॥

डोंगरी वणवा हाय लागली तनाला ।
मालण माझी बया घाली आगळ मनाला ॥५९५॥

---

१ केळीचें कमळ = केळफूल.

२ शुभप्रसंगीं गेरूचीं किंवा शेंदराचीं पांच बोटें अुमटविण्याची पद्धत आहे. (अु० घराच्या भिंतीवर; पोळ्याला बैलांच्या शरीरावर वगैरे). ३ वळण. ४ गरीब.

५ महाराष्ट्रांतील खेड्यांतून पाण्याची फार टंचाअी असते. तरीसुद्धा आअीने अत्यंत कष्टाने विहिरींतून विपुल पाणी काढून मुलीला न्हाअूं घातले असा भाव. या ओवीला विरोधात्मक असणाऱ्या शेजारणीवरील ओव्या पुढे देण्यांत येतील. शेजारीण न्हाअूं घालते त्या वेळीं डोक्याचा शेंडाहि भिजत नाही अशी कल्पना त्यांत असते.

६ म्हणजे रात्र संपून पहाट अुजाडेपर्यंत मायलेकींच्या गुजगोष्टी चालल्या होत्या.

७ मायलेकींच्या सर्व गुजगोष्टी सांगून संपल्या तरी लेकाला त्याचा पत्ता नव्हता. तो किती तरी अुशीरा अुगवला. म्हणजे मायलेकींत जितका जिव्हाळा असतो तितका मायलेकांत नसतो.

८ किंवा— "सुख सांगतानी दुःखाचा आला लोंढा ।
आता माझी बाअी हात लाविते माझ्या तोंडा ॥"

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मायलेकीचं मांडयण जशी दुधाची अुकयळी ।
बयाला किती सांगू माता मनाची मोकयळी ॥
मायलेकीचं मांडण दह्यादुधाचा गेला लोंढा ।
सांगती बया तुला आग लागो माझ्या तोंडां[1] ॥
डोंगरीचा साप तनां[2]मधीं लोळ ।
लेकीचं नाही बरं मातेचं हिर्दं[3] जळ ॥५९८॥
जिवाला जड भारी आयाबायांनी मरला सोपा ।
मालण माझी बया माझी वाघण टाकी झेपा ॥

जिवाला जड भारी दूधसाखर घोटना ।
मालण माझी बया अुशाची अुठना ॥६००॥
जिवाला जड भारी माझं दुखत नाही कांही ।
तुझ्या बोलण्याचा[4] शीण हृदयाला आला बाअी ॥
जीव माझा गेला सरण जळ सावलीला ।
अितुक्या गोतांमधीं दुःख माझ्या माअुलीला ॥
जीव माझा गेला कुडी पेटली पेवांत ।
मालण माझी बया हरण गर्जती गांवांत ॥६०३॥

लग्न होअून आअीपासून दूर गेलेल्या मुलीला आअीबद्दल जी विशिष्ट हुरहूर लागून राहते ती कांही ओव्यांत चित्रित केलेली आहे. त्यांतून मुलीच्या दिसून येणाऱ्या भावना या हिंदुसमाजांतील विशिष्ट लग्नपद्धतीच्या द्योतक आहेत—

देशोदेशींचं पाणी लागना मला गोड ।
ज्या देशीं माझी बया त्या मुलखाचं मला येड ॥
घडुघडी खंत वाटते अेकीची ।
गंधाऱ्या गोदूची माझ्या प्राणसखीची[5] ॥६०५
रात न् दिवसाचं करीतें तुझा घोक ।
मावली माझी बया सपनीं दावी मुख ॥६०६
दूरल्यां देशीचं कुणी येअीना जाअीना ।
आता माझी बाअी मला दृष्टावा दावीना ॥६०७॥
जिवाला जड भारी नका सांगू अेकाअेकीं ।
मालण माझी बया घाबरी होअील सखी ॥६०८
जिवाला जड भारी नका सांगू घाअीघाअी ।
म्यापली माझी बाअी रात्र म्हणायाची नाही ॥
जिवाला जड भारी कुण्या वैऱ्यान नेली मात ।
म्यापल्या बाअीला आडवी शिर्णा[6] झाली रात ॥

जिवाला जड भारी सांग दासूद जातां जातां ।
माझ्या बयान तांब्या टेविला तोंड धूतांधूतां ।
माझ्या बंधुजीन सहाण सारिली गंधलेता ।
पिता माझा बाजी आला शुक्री अुगवतां ६११
जिवाला जड भारी धरणीबाअी अुकलली ।
मालण माझी बया कायामाया मोकलली ॥
जीव माझा गेला जिवाची झाली माती ।
बयाबाअी माझी बोंबलत आली होती ॥६१३
आयव मेली नार जन म्हणत बरं झालं ।
बया माझी बोल गाळीव सोनं गेलं ॥६१४॥
खावीशी वाटली वल्या तांदळाची खीर ।
किती जिवाला देअूं धीर माझ्या बयाचं गांव दूर॥
खावंसं वाटलं[8] मला तळीव कारलं ।
फोडुनी पहातां आंत साजासकट डोरलं[9] ॥६१६

१ रागाच्या भरांत आअीला वाटेल तसें बोलल्यानंतरचे हे पश्चात्तापाचे अुद्गार आहेत.

२ तृण. ३ हृदय.

४ किंवा— "अुदास बोलण्याचा".

५ किंवा— "घडुंघडी खंत वया माझीच्या मुखाची ।
माळबाच्या मळ्यांत अुंच जांभुळ झोकाची ॥"

६ शिणा नदी तरून जातांना.
किंवा २ री ओळ:— "सावळी माझी बाअी पडली काळोखाची रात ॥"

७ पहाटेस.

८ किंवा "बयान धाडीलं".

९ मुलीला तळलेलें कारलें खाण्याची अिच्छा झाली आहे असें कळतांच आअीने तें पाठवलें अितकेंच नाही तर त्यांत तिला भेट म्हणून डोरलें व साज हे दागिनेहि लपविले. अेवढी मोठी भेट आअी पाठवते तरी ती बिलकुल गाजावाजा न करतां यांतच तिची थोरवी.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

खाव्याशा वाटल्या मला गुळाच्या पोळ्या ।
फोडुनी पाहिल्या आंत गजनीच्या चोळ्यां ॥[1]
माझ्या बयान धाडिलं प्रकारचं हुंडं ।
फोडुनी पहाया गेलें आंत बुगडीचीं बोंडं ॥
चांगुलपणाचं येड लागलं जीवाला ।
सयाला सांगतें जातें बयाच्या गांवाला ॥६१९॥
खांद्यावरी धोतर गांवाला जातें बाअी ।
माझ्या बयाचं सांगावं झालं कांही ॥६२०॥
बयाच्या गांवा जाया मला सुकून झाला बेस ।
आडवा गेला तास[2] हरणी पाजते पाडस ॥
अुदंड भेटली झाडीचा झाडपाला ।
बया माझी भेटली जाअी शेवंती वास आलं[3]॥
काम केलं थोडं मला घाम आला लअी ।
मावलीच्या घरीं सुखकर माझा देही ॥६२३॥
जेवण जेविलें खिरीवरी केळं ।
माझ्या बयाचं राज्य भोळं ।
केलं साखरेचं आळं आंत तूप डळमळ ॥६२४॥

याच्या अुलट बापाबद्दल वाटणाऱ्या प्रेमांत जिव्हाळ्यापेक्षा आदराचाच भाग अधिक असतो. (अेका ओवींत– नं. ६३५– मात्र आअीपेक्षा बापाचीच ओढ आपल्याला अधिक आहे असें गाणारी स्त्री म्हणते.) पित्याचा मुलांवर जितका दरारा असतो तितकाच मुलांना त्याचा मोठा आधारहि वाटत असतो. पितृसत्ताक कुटुंबपद्धतींत घराण्याचें नांव व दर्जा कायम राखणें हें पित्याचें कर्तव्य असतें. म्हणूनच पित्याबद्दलचा अभिमान प्रत्येक मुलगा व मुलगी बाळगते आणि त्याच्या नांवलौकिकाला काळिमा आणणारें कुठलेंच वर्तन आपल्या हातून घडूं नये म्हणून काळजी घेते. फक्त अेकाच ओवींत मुलांना विद्या देण्यासंबंधीच्या बापाच्या कर्तव्याचा अुल्लेख आहे—

पित्या माझ्या बाजी माझ्या काशीच्या कचर्नो[4]।
तुझ्यापासुनी माझ्या पिंडाची रचना ॥६२५॥
माझी जातकूळ कोण पुसतो वेडादाजी ।
अशीलाची माझी आजी तिच्या पोटीचा पिता बाजी ॥६२६॥[6]
माझी जातकूळ कोण पुसतो सांदीचा[5] ।
निर्मळाची लेक[6] खरा रुपया चांदीचा ॥६२७॥
जाअीन सभतून वाजूं देअींना जोडवं ।
पित्याच्या नांवाला कुणी लाविना आडवं ॥
जाअीन सभतून दंडभुजा झाकून ।
नांव पित्याचं राखून ॥६२९॥
संगत करूं नारी संगत्या काय देतो ?
आपल्या पित्याचा अभिमान खाली होतो ॥
रुसला भरतार याला रूसायाची सवय ।
जगतापाच्या लेकी आम्ही समजावयाच्या नाय ॥६३१॥
वाघिणीच्या वाघा नाही तुला भ्यालें ।
पित्याच्या जीवावरी तुझ्या तळयाला पाणी प्यालें॥
हसून खेळून आला दिवस लोटावा ।
बाजीच्या नांवासाठी पेला अिपाचा घोटावा॥
हसून खेळून जग म्हणत मातली ।
पित्याच्या नांवासाठी देहीं करवत घातली ॥
साखरपरास दूधपेढा लअी गोड ।
बयापरास मला बापाची लअी ओढ[7] ॥६३५
पोथीपुस्तकानं भरला रांजण ।
पित्या बाजीन येदीं[8] लावली बामणान ॥६३६

१ किंवा:— "बयान धाडिल्या प्रकारच्या पोळ्या
फोडुनी पाहतां कुतणीच्या चोळ्या ॥"

२ तास पक्षाचें दर्शन म्हणजे शुभचिह्न समजलें जातें.

३ झाडीचा झाडपाला नेहमीच दिसतो. पण जाअीशेवंती कधी दिसली तर लगेच सुवास येतो. त्याचप्रमाणे अितर नातलग पुष्कळ भेटतात. पण आअी भेटली की लगेच प्रेमाचा अुमाळा येतो.

४ कसणी. ५ आडजातीचा. ६ किंवा "पिता माझा बाजी"

७ किंवा "दूधपेढा" याअैवजी "बत्तासा" व चौथा चरण "मला पित्याबाजीचं येड अशीहि रचना सांपडते. ८ विद्या.

स्वतःच्या पित्यावरून गाअिलेल्या अितरहि सामान्य ओव्या मिळतात. प्रत्येकींत बापाचा मोठेपणा दर्शवण्याचा प्रयत्न केलेला आहे—

दिवाणवाड्यासमोर येली गेली रायचिंच ।
माझ्या पित्याची कवळी अुमल ब्रोली अूंच ॥
दिवाणवाड्या गेला अुभा दरवाज्यातोंडीं ।
माझ्या पित्यानं दिली वकिलापाशीं मांडी ॥
हौस मला मोठी हंड्याशेजारीं तपेल्याची ।
नाना माझ्या भुजदेवा होती अंघुळ वकीलाची ॥
वाकरी गांवाच्या पारावरी चांदसुर्व्याचीं झाडं दोन ।
पित्या माझ्या ब्राजी अून झालंय सभा मोड ॥
वैरायाळ्या दादा मर मला कालकिंता[1] ।
तुला मोलाची काय चिंता चल दावून देती पित॥

लुगड्याची घडी टाकिली जात्यावरी ।
माझा रुसवा पित्यावरी ॥६४२॥
अंगणांत अुभा कां र ब्राळा चितागती[2] ?
ताअीत माझ्या ब्रंधु तुला पित्याची सअी होती ॥
सरगीच्या वाट कुणीं लाविल्यात अूस !
माझा पिता ब्राजी सरगीं जायाच नव्हत दिसं[3] ॥
गुणाचं माणूस गुण करून गेलं गांवा ।
नाना माझ्या दौलतीचं अंगणीं झाड लावा ॥
सणांमधीं सण आला महाळाचा[4] महिनों ।
पिता माझा ब्राजी मला सरगीचा पाहुणा ॥६४६॥

(२) **वात्सल्य**—मातेला आपल्या अपत्यांब्रद्दल वाटणाऱ्या वात्सल्याच्या पोटीं अनेक गीतांचा अुगम झालेला आपण सर्वत्र पाहतों. आपल्या तान्ह्या अर्भकाला जवळ घेतलें की साधारणपणें कुठल्याहि मातेला काव्य सुचूं लागतें. महाराष्ट्रांतहि अशा रीतीने वात्सल्याने पूरित असलेल्या ओव्यांना तोटा नाही. लहान मुलाला निजवितांना तर अशा प्रकारच्या ओव्या आळविल्या जातातच, परंतु जात्यावर दळण्यास ब्रसलेल्या स्त्रीलाहि आपल्या समोवताली दुडदुड धावणारें, खेळणारें किंवा निरर्थक ब्रोबडे ब्रोल अैकविणारें मूल हा अेक अत्यंत आकर्षक स्फूर्तिविषय वाटल्यास त्यांत आश्चर्य तें काय ?

स्त्रीला वाटणारें वात्सल्य हें केवळ आपल्याच मुलापुरतें मर्यादित नसतें हें या ओव्यांवरून स्पष्ट दिसून येअील. सामान्यतः कोठल्याहि लहान मुलाकडे स्त्रिया प्रेमाने व कर्तव्यदृष्टीनेच पाहतात. विशेषतः शेजारणींब्रद्दल[5] ओव्यांतून पुष्कळदा दिसून येणाऱ्या मत्सरादिं भावना पाहिल्यां म्हणजे त्यांच्याच मुलांब्रद्दल मात्र वात्सल्याचे अुद्गार काढले जावेत ही नवलाचीच गोष्ट होय !—

पोटीच्या ब्राळकांनी नार लौकिका चढली ।
शंब्रर गोताची दारीं पंगत पडली[6] ॥६४७॥
मेव्यामधी मेवा गोड मेवा लेकराचा ।
माझीं आुब्राअी गोड ब्रत्तासा साखरेचा ॥
धनसंपत्तीची मीं आशा नाहीं केली ।

दोन माझीं ब्राळं भिस्त त्यांच्यावर दिली ॥
धन या संपत्ता नाही मजला लागत ।
सांगतें ब्राअी माझी पोटीं ब्राळाची आगत ॥
धनसंपत्तीला कुणी पुसना मालाला ।
'किती महिने झाले तुझ्या कडच्या लालाला[7]'?॥

---

१ निरनिराळ्या (कालाकित्ता) वांगड्या. २ चिंताग्रस्त. ३ दिवस.

४ महाळाचा म्हणजे भाद्रपद महिना; या महिन्याचा दुसरा पंधरवडा म्हणजे पितृपक्ष समजला जातो.

५ शेजारणींवरून रचलेल्या ओव्या पुढे देण्यांत येतील.

६ घरांत मूल असलें की बारसें वगैरे अनेक कारणांनी नातलगांना मेजवान्या देण्याचे प्रसंग वारंवार येतात व लौकिक वाढतो. ७ असेंच प्रत्येकजण विचारतो.

"मालाला" याअैवजीं "वस्त्राला" असाहि शब्दप्रयोग मिळतो व दुसऱ्या ओळीची शब्दरचना खालीलप्रमाणेहि आढळते— "पोटींचं तान्हं बाळ खेळत रस्त्याला ॥"
किंवा "माझ्या वंधवाला कन्यापुतर लालाला ॥'

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

संपत्तीच्या नारी नको बसूं शेजाराला ।
पोटीचीं दोन्ही बाळं जर माझ्या पदराला[1] ॥
शेजी नेसती पांचाचं माझं रुपयामराचं ।
राघू मैना दोन्ही पदार जराच ॥६५३॥
पांचाचं नेसावं बांडाला काय होतं ?
नेणता बाळराज कडला शोभा देत ॥६५४॥
दुबळ म्हणून शेजीं नार संपत्तीची काय देअील ?
घेअील दोन माझीं बाळं मोल हिऱ्याला होअील॥
दंडांत दंडयेळा नार हिणयीते मला ।
पोटीचं पाठीचं सोनं दाविथितें तुला ॥६५६॥
अग नखऱ्याची नार तुझा नखरा काढीन ।
तान्हा माझा ग बाळराज चंद्र वाड्याला धाडीन॥
दोन्ही माझ लाल मालाच माझ हंड ।
नेणती गवळण त्या हंड्याला कडीदंड ॥६५८
भरीला वाजार बारामती गुजरीचा ।
माझीं बाळराज राघूमैनाच्या पाठीचो ॥६५९
मोत्या पवळ्याचा पाअूस नाही पडत बारा मास।
अग माझ्या बाअी कर बाळाचं सायास ॥
देव नाही देवळांत देवाळ कशाला बांधितो ।
पोटीं नाही पुत्रफळ कीर्त कुणाला दावितो ? ॥
आपल्या मनांमधी खोटकपट नसावं ।
शेजीच्या बाळाचीं आपल्या पदरान नेत्र पुसावं ॥
लोकाच्या लेकराला नको मारूंस चोरून ।
देव भगवान मन पहातोया वरून ॥६६३॥
लोकाच्या लेकराला नको म्हणूं वालवाले[3] ।
माझ्या बाळासाठी घरला माझ्या आलं ॥६६४

शक्य तितक्या लवकर घरांत पहिला पाळणा हलावा हीच प्रत्येक धार्मिक हिंदूची अिच्छा असते. आणि शक्य तितकीं जास्त मुलें असणें म्हणजे मोठी दैवाची गोष्ट समजली जाते. म्हणूनच अगदी तरुण वयांत माता किंवा पिता होण्याचें भाग्य लाभलेल्या आपल्या भावंडांचें कौतुक खालील ओव्यांत स्त्रीने केलेलें आहे. मुलालेकरांनी आणि लेकीसुनांनी 'भरलं घर' म्हणजे केवढी पुण्याची गोष्ट !

सामान्यतः जुन्या हिंदु कुटुंबांतील स्त्रीच्या डोक्यावर सकाळपासून संध्याकाळपर्यंत कामाचें केवढें ओझें असतें. परंतु घरांतील अेखाद्या सुनेचें अंगावरचें लहान मूल असलें की तिच्या बाबतींत कुटुंबांतील मंडळींची दृष्टि बरीच सहानुभूतीची असते. आणि म्हणूनच तिच्या कामांतील दोष क्षम्य समजले जातात—

लेकुरवाळा झाला जाअीना पोरपणा ।
माझ्या बंधवाला किती टाकूं लिंबलोण ? ॥
नवल वाटलं कालयेंगदीचं[4] दादा ।
माझ्या बंधूच्या कडला तान्ही राधा ॥६६६॥
पाअूस पडयीतो मिर्गाआधी रोयणीचा ।
पाळणा हालतो भावाआधी बहिणीचा ॥६६७
बारा वर्सं झालीं वाघा तुझ्या वाघिणीला[5] ।
माझ्या बाअीला नित फळं डाळुंबीला ॥६६८
शेजबाजेवरी चिल्यापिल्यांची नागीण ।
माझी मायाबहीण कंताची सौभागीण ॥६६९
पांची उतरंडी शिंक गेलं गगनाला ।
माझ्या बयाला लेकीसुना चांगुणाला ॥६७०॥

१ किंवा १ ला व ३ रा चरण अनुक्रमें "लेण्यालुगड्याचो नारी" व "वाणीचं माझं बाळ" असेहि आढळतात.

२ बारामतीचा बाजार भरला असला तरी माझा बाळा ढे मला त्याचें काय ? असा भाव.

३ लांब हो.

४ "कालयेगदीचा" या शब्दाच्या व्युत्पत्तीबद्दल तर्कबुद्धि चालत नाही. परंतु साताऱ्याकडील महार स्त्रियांच्या तोंडीं "कालयेगदीचा पोर" हा शब्दप्रयोग "कालचा पोर" (लहान वयाचा) या अर्थी अुपयोजिला जातो.

५ लग्न होअून बारा वर्षे झालीं तरी भावजयीला मल नाही, वहिणीला मात्र पुष्कळ आहेत, असा भाव.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

समुरल्यां घरीं तेलाचा गेला पाट ।
माझी बयाबाओी लेकीसुनाची राजवट ॥६७१
वैराळदादा बस पानाओी खालता ।
गंधारी माझी बया लेकीसुनांची येओील आता ॥
दुबळा भरतार नको म्हणूं त्या दुबळा ।
लेकलेकीचा दुबळा मोत्यापवळ्यानं भरलं गळा[1]॥
लेकुरवाळीचं मोलान काम घ्यावं ।
बबनबाओीला लांब खेळायाला न्यावं ॥६७४॥
लेकुरवाळीचं आमगाळ रंधान ।
तिच्या रांजणीला पाणी प्याला भगवान ॥
अग लेकुरवाळीला तिला म्हणती कामनाशी ।
तिन जबाब दिला मला लाग अुशीर बाळापाशीं ॥
अग काजळकुकू ल्याली डबी तेथंच विसरली ।
तान्ही[2] माझी तूं बाओी तरी गोप्यांत दंग झाली ॥

मुलाच्या जन्मासंबंधीच्या हिंदूंच्या जुन्या धार्मिक किंवा खेडवळ समजुती खालील ओव्यांत व्यक्त झालेल्या आहेत. मूल होणें न होणें आपल्या कर्मावर आणि नशिबावर अवलंबून असतें ही कल्पना सार्वत्रिक आहे; म्हणूनच मुलें वांटीत चाललेल्या देवाजींचें चित्र या ओव्यांतून रंगविलेलें सापडतें. मूल नसलेल्या स्त्रीचें अतीव दुःख व मुलासाठी नवससायास करतांना तिला पडणारे कष्ट दोन्हींची कल्पना या ओव्यांवरून येओील. पुरुषाचें कुटुंबांतील स्थान आणि त्याचा सामाजिक दर्जा यामुळे अेकंदर हिंदुसमाजांत कन्याजन्मापेक्षा पुत्रजन्माचीच अिच्छा अधिक प्रबळ असते. या ओव्यांतूनहि अेक विशेष गोष्ट चटकन लक्षांत येओील की ज्या ठिकाणीं खास करून अुल्लेख केलेला आहे त्या ठिकाणीं तो पुत्राचाच आहे—

जलम देतांना तिथ होतं कोण कोण ?
बया बाबा दोघंजण तीसरा नारायण ॥६७८॥
शेजबाजेवरी अेका पिर्तीचीं दोघंजण ।
देवाजीचं देणं मधें तिसरं तान्हं बाळ ॥६७९
पोटीचीं पुत्रफळं देव चालला वांटीत ।
चतुर माझी बाओी ओटी पसरावी दाटींत[3] ॥
पोटीचीं पुत्रफळं नाही नारीच्या नांवराशीं ।
काय करील देवऋषी ? ॥६८१॥
दरव्याच्या कांटीं मोत्यापवळ्याच्या झाल्या लुटी।
नार नशिबाची खोटी हातीं लागली गारगोटी ॥
सटवी अकशार बर्म्यो लिचितो घाओीघाओी ।
नारीच्या नशिबांत लिवलं नाही काहीं[5] ॥६८२
देवीचं देवाळ कोण लोटिते अेकली ?
जीवीची मायाबहिण तान्ह्या बाळाला भुकेली[6] ॥
हातांत बेलतांब्या नार शिखराला अुभी ।
पोटीच्या बाळासाठी शंभुदेवाची सेवा करी ॥
नवस बोललें पिराला कंदुरी[7] ।
माझ्या बंधूचं बाळ खेळुंदे मंदिरीं ॥६८६
नवे नवस करूं गेली बाळबचा या माझ्यासाठी।
देग देवाला मागविती देवपुत्र माझ्या पोटीं ॥
शंभुचे पिंडीवर बेल वाहिला शिळा ताजा ।
पुत्र मागून गेला राजा ॥६८८

---

१ ही दुसरी ओळ "मोत्यापवळ्याचा दुबळा लेकलेकीन भरला गळा ॥" अशा अर्थी जास्त सयुक्तिक वाटते.

२ कितीहि मोठ्या मुलाला व मुलीला अुद्देशून वात्सल्याने 'बाळ' या अर्थी 'तान्हा' व 'तान्ही' हे शब्दप्रयोग ओव्यांत दिसून येतात.

३ किंवा:— "पोटीचीं पुत्रफळें देवाजी देता झाला ।
माझ्या बंधवांनी शालुचा ओटा केला ॥"

४ महादेव.

५ किंवा "घाओीघाओी" या अैवजी "तांतडी" असाहि शब्दप्रयोग आढळतो व चौथा चरण "रेघ पडली वाकडी" असा केला जातो.

६ किंवा:— "देवाचं देवाळ लोटिते केसान ।
माझी माया बहीण बाळ मागती नवसान ॥"

७ बकऱ्याच्या मांसाचा नैवेद्य.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

नवस करूं गेली नवसासारखा माझं झालं ।
तान्ह्या माझ्या त्या बंधुजीचं बाळ ओसरीं पाणी न्हालं ॥६८९

देवाच्या देवळीं गेलें होतें काल ।
मला देवाजीनं दिलं अेक पुतळी दोन लालें[1] ॥६९०॥

अर्थात्च घरामध्ये मुलाचा जन्म म्हणजे केवढ्या मोठ्या अुत्सवाची गोष्ट असते ! अशा वेळीं स्त्रियांचा अुतूं चाललेला आनंद आणि धावपळ खालील ओव्यांतून सुंदर तऱ्हेने प्रतिबिंबित झालेली आहे. विशेषतः बहीण व भाअू अेकमेकांना झालेल्या मुलाचें स्वागत मोठ्या अुल्हासाने करतात. या ओव्यांतहि प्रत्येक ठिकाणीं पुत्राचाच अुल्लेख केलेला आहे. शेवटल्या ओवींत तर या मुद्यावर चांगलाच जोर दिलेला आहे--

बंधुला झाला लेक आली साखर माझ्या गांवा।
मी त वाटितें जावाबावा दीर दाजिबा तुम्ही जावा
रामचंद्र नांव ठेवा आगाशीं दिवा लावा ॥
पातळाच्या निऱ्या घाल्तें घाअीघाअी ।
बंधुला झाला लेक बारशाला जातें बाअी ॥
जेजुरी गडावरी काय वाजतं गुजुगुजु !
बहिणीला झाला लेक भाअू नवसाची बांधी धुजें[2] ॥६९३॥
साखर शेरणी घ्या ग बायांनो आणिक ।
झालं हिऱ्याला माणिक ॥६९४
साखर शेरणी घ्या ग बायांनो थोडी थोडी ।
बंधुला माझ्या झाला हिरा नव्ह हिरकणी ॥

आअीबापांमधील क्षुल्लक तंटे मिटविण्याचें सामर्थ्य तान्ह्या मुलांत नकळत किती असतें पाहा--

रुसला भरतार रुसल जवा तवा ।
माझी लक्षाबाअी आडवा गोपाँ[3] द्यावा ॥६९६

वाढत्या मुलाच्या प्रत्येक स्थितींतील बाललीलांचें वर्णन करतां करतां तर आअीला शब्द अपुरे पडत असतील. त्याचे हरतऱ्हेचे लाड पुरवण्यांत ती दंग असते. रांगतें खेळतें मूल म्हणजे घरांतील सर्वांच्याच कौतुकाचा विषय असतें; आणि म्हणूनच त्याला कुणाची दृष्ट लागेल कीं काय याची आअीला सतत काळजी--

अग घरचा घरधंदा सर्व बाअी र माझा कान्हा।
माझा तान्हा ग माझा तान्हा ॥६९७
लावणीचा आंबा पाणी घालितें कौलान ।
तान्हं माझं बाळ आंबा वाढतो डौलानं ॥६९८
अंगडं टोपडं ठेवितें झोळण्यांत ।
तान्ही माझी आबुताअी खेळती पाळण्यांत ॥
अग पालीखपाळणा मोती कचील दोरीला ।
तान्ह्या माझ्या त्या बाळाला नीज म्हणतें हरीला॥
माझ्या मैतरिणी सुताराच्या मागू ।
बाळाच्या पाळण्यावर रंगीत काढ राघू ॥७०१
पाळण्याचा दोर वाजतो कराकरा ।
अैका बाळाचा होकारा ॥७०२
लाडक्या लेकीचं नांव ठेवितें जयागया ।
माझ्या आवडीची अनसूया ॥७०३
तोंडांत घाली तोंड आहे राघूची लाल चोंच ।
माझी आबुबाअी जीवीची मैना तूंच ॥७०४
नेणतं लेकरूं[4] आहे मोंवताचा मेवा ।
माझ्या आबुला अुचलुनी कड घ्यावा ॥७०५
राघू माझ्या घरीं पिंजरा घेती नवा ।
दोन्ही माझ्या बाळांचा राघूमैनाचा जुवा[5] ॥

१ पुतळी = मुलगी; लाल = मुलगा.

२ ध्वजा.

३ तान्हें मूल.

४ किंवा "तान्ह अेवढं बाळ".

५ किंवा "राघू माझ्या घरीं घेतें पिंजरा चांदीचा ।
सदाशिव माझा डाळिंबीच्या आधीचा ॥

सुपली कुरकुली आला बुरूड मिरजेचा ।
तान्ही माझी आवुताओी खेळ माझ्या गिरजेत्रा ॥
लाडक्या लेकीन छंद घेतला नाही त्याचा ।
माझी आवुताओी चंद्र मागती आकाशीचा ॥
माझ्या अंगणांत कोणीं सांडली तूपपोळी ।
तान्ही माझी चंद्रावाओी जेवली चाफकळी ॥
तान्ह्या बाळाचं तोंड माजलं माजीन ।
साखरेची सव सव लावली आजीन ॥७१०
तान्ह्या बाळओीची नका करूं भाजी माजी ।
आवुवाओी माझी नखुल्याची सोजी ॥७११
अग दृष्ट ग झाली म्हणूं मीठ मोहऱ्या काळा त्रिभा ।
तांन्हं माझं तें बाळराज राघू दृष्टेन केला वेडा ॥
अंग नवतीच्या नार तुझ्या नवतीला आग लागो ।
तान्ह्या बाळाच्या ग नको मागं लागूं ॥७१३
तान्हं माझं बाळ सैज[1] अुंबरा येंगलं ।
मामा म्हणाया लागलं ॥७१४
अग हसत बोलत बाळा हुंबरें[2] ये गाओीला ।
तान्हा माझा ग कान्हा मामा म्हणाया लागला ॥
बोबड्या बोलण्याचं बाळा मजला येतं हास ।
नेणत्या माझ्या राघू फिरुनी बोल कैसं[3] ॥७१६
बोबड्या बोलण्याची वाटते मला मजा ।
बंधूचा माझ्या बाळ माझा बिंग्लिश बेंडबाजा ॥
दिल्याघेतल्याचं पाणी पुरना नओीचं[4] ।
माझ्या बाओीचं गोड बोलणं सओीचं ॥७१८
बाळ खेळतं आळोआळीं सर्व्या आळीला आनंद
वाणीचा माझा बाळ नकल्या माझा गोविंद ॥
जिकड जाओील तिकड माझा डोळा ।
वाणीचं माझं बाळ नवतीचा पानमळा ॥७२०
किती हाका मारूं लेकन्या जीनसाला ।
माझ्या मोत्यांच्या कणसाला ? ॥७२१
किती हाका मारूं अुमी राहुनी पेडमधी ?
वाणीचं माझं बाळ चंद्र कुणाच्या वाड्यामधी ? ॥
किती हाका मारूं अुभी राहुनी अेकली ?
माझा पांडुरंग सदा गंधाची टिकली ॥७२३
हसून खेळून बाळ आलया विसाव्याला ।
बबनबाओीला मांडी देतें बसायाला ॥७२४
माळ्याच्या मळ्यामधी माळिणी दोघी जावा ।
फुलं तोडीत माझा राघो ॥७२५
माळ्याच्या मळ्यांत कोण बसला कोपींत ?
वाणीचा माझा बाळ फुलं तोडीतो टोपींतं[6] ॥
भरल्या बाजारांत काय दिसतं लाल लाल ?
तान्हं माझं बाळ अुभं पेटेला मखमल ? ॥
अंगणांत अुभा माझ्या अंगणा देतो शोभा ।
वाणीचं माझं बाळ खण माझ्या चोळीजोगा ॥
गांवाच्या खालती आहे बारव कशाची ?
वाणीचीं माझीं बाळं पाणी पिती जोडी गरुड-पक्षाची ॥७२९
आता जळो ग माझी दृष्ट दृष्टेचं झालं पाणी ।
अुन्हाच्या कहारांत बाळ सुकलं जाओीवाणी ॥
नवस करीतें नवसा पडली जकात ।
वाणीचा माझा राघू नवसाचा गोपीनाथ ॥
लवंग मसाल्याचा पानांचा पानपुडा ।
नेणता माझा राघू वासाचा येलदोडा ॥७३२

आओीचें आपल्या मुलावर किती गाढ प्रेम असतें आणि त्याच्याकरिता प्राणांची कुरवंडी करण्याचीहि तिची कशी तयारी असते याची कल्पना खालील ओव्यांवरून येओील--

वाटवरील वारुळाला अुजवी[7] घालतें येतांजातां ।
हात मी जोडीतें येशीपासुनी वेताळाला ॥
राघू माझ्या मैनाला सुखी ठेव नागनाथा ॥
राघवाला माझ्या राख माझ्या गोपाळाला ।

१ सहज.
२ हुंबर हा अेक गुराख्यांचा खेळ आहे.
३ किंवा २ री ओळ:— "तान्हा माझा तो बाळराज आणिक बोलतस ॥"
४ नदीचं.
५ मुलगा.
६ किंवा 'कोपींत' व 'टोपींत' यांबद्दल अनुक्रमें 'अेरंडांत' व 'करंडांत' अशीहि शब्दरचना मिळते.
७ अुजवीकडून प्रदक्षिणा.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

राग मला भारी राग करूं कुणावरी ?
पोटीचीं दोन बाळं सत्ता माझी तुझ्यावरी ॥
बाअी राग ग रुद्ध झाली आपल्या बाळावरी।
अग सयानो किती सांगूं सत्ता चालवा लोकावरी॥
हासत बोललें तुला खरंच वाटलं ।
माझ्या लक्ष्मणा पाणी नेतरा दाटलं ॥७३७
लेकाच्या मायाअीला कशाचा तोटा ?
पाणी हौदला मारी लाटा[1] ॥७३८
तुझ्या जीवासाठी होअीन वनीची बारव ।
नेणत्या राघू माझ्या तूं त चिरा मी पारव ॥
तुझ्या त्या जीवासाटीं जीव माझा थोडाथोडा।
तान्हा माझा तो बाळराज सखरा पायांत घाल जोडा ॥७४०
तुझ्या जीवासाठीं जीव मी अपुला देअीन ।
खालीं तुझी मान वर मी अपुली टेवीन ॥
तुझ्या जीवासाठी जीव देअीन खचित ।
जन्म दिलेली गोद माझी कां ग मनांत दुचित ॥७४२

लहान मुलांचा देव नेहमी पाठीराखा असतो अशी कल्पना दोन ओव्यांत आहे—

तान्ह्या बाळाअीची कुणी करीना मायादया ।
देवरायाची त्याला साया[2] ॥७४३
अीश्वर पार्वती दोघ विचार करिती ।
तान्ह्या माझ्या त्या बाळाला हातीं धरावं म्हणती॥

पुष्कळ मुलगे असावेत अशी जरी मातेची अिच्छा असली तरी अेकुलता अेक मुलगा असला म्हणजे तो तिचें सर्वस्व असतो—

अेकुलता अेक नका म्हणूं पांडवाला ।
अेक कारलीचा वेल गर्दी झाली मांडवाला[3] ॥
अेकुलता अेक माझा वनामधी चाफा[4] ।
हिरासरावोंअी नागीण टाकी झेपा ॥७४६

मोठ्या मुलावरूनहि स्तुतिपर अनेक ओव्या रचलेल्या असतात—

अेकामागे अेक चालले बापलेक ।
आता माझ्या बाळा दृष्ट होअील मागं थोप ॥
नवतीच्या नारी तुझी नवती अशी कशी ?
बाळ माझा लक्ष्मण लेक बापाचा सासुरवाशी॥
अंशाळ चंचाळ नार नसावी शेजाराला ।
हरीवा बाळाला येडा करील गुजराला ॥७४९
नटत नटयीतो गांवाला गेल्यावाणी ।
तान्हा माझा तो अेकनाथ सुरत लालाची कोमेजली ॥७५०
नटुन खोवून कुठ चालला बनून ?
किती हाका मारूं तुला शिपाया म्हणून ? ॥
अष्टांगीबाअीची वाट मला दिसते धोपट ।
काळ्या छत्रीखाली बाळ चालला पोपट ॥
जिरसाळीच तांदूळ मी कां येळतें भोजनाला।
तान्ह्या माझ्या त्या बाळाला करतें जेवण सजणाला ॥७५३
माझ्या अंगणांत आहेत कारल्याच्या फोडी ।
अंघोळीला गेली लवअंकुशाची जोडी ॥
माझ्या अंगणांत सांडली सुपारी ।
अंघोळीला गेला पंचवटीचा व्यापारी[6] ॥७५५
माझ्या ग दारावरन डफ धाधरी चालू गेला ।
माझ्या बाळयान कुठ राधेचा[7] खेळ केला ॥
गांवाला गेला कुण्या मला कां पुसुनी नाही गेला ?
तान्हा माझा तो बाळराज तुझा अन्याय काय केला ? ॥६५७
गांवाला गेला कुण्या तुझं असं कसं जाणं ?
नवं धोतर झालं जुनं माझ्या राघोबाला तुला मेवणं लग्नी जणं ॥७५८

१ किंवा 'तोटा' व 'मारी लाटा' याअैवजी अनुक्रमें 'दुकाळ' व 'वकाळ' अशीहि शब्दरचना आढळते.
२ छाया.
३ अेकच मुलगा असला तरी त्याच्यामुळे नातलग मंडळी अेकत्र जमण्याचे अनेक प्रसंग येतात.
४ मुलगा. ५ मुली. ६ राम– मुलाला अुद्देशून.
७ शिमग्यामध्ये खेड्यांतील लोक जे अनेक खेळ, नाटकें वगैरे करतात त्यांत कृष्णाचीं नाटकेंच बरींचशीं असतात व त्यांतून स्त्रियांच्या भूमिका मुलगेच करतात.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

रुप्याच्या कंदिलाला त्याला लाविली जोडवात।
गांवीं गेला ग बाळराज रात्र झालीया तालुक्यांत ॥७५९॥
अगाअी तूं ग मुंबादेवी तुला सेवयाचं बोनं[1] ।
आअीला ग किती सांगू तुझ्या नगरीं ग माझं सोनं ॥७६०

जीवाला जड भारी धरणी लोळत माझं केस।
माझ्या बाळराजा मांडी देअून नीट बस ॥
जीव माझा गेला गणागोताचा कालवा ।
पोटीचा बाळराज धनी पाण्याचा बोलवा[2] ॥

लिहितांवाचतां येणाऱ्या 'विद्वान' मुलाचें कौतुक--

पोथीपुस्तकान तुझ्या मांडीला झालं ओझं ।
अर माझ्या बाळा गिन्यांनी हिर्दे तुझं ॥७६३
पोथीपुस्तकान माझा भरला रांजण ।
नेणतें माझं बाळ पोथी वाचतें अंजन ॥७६४

गांवाला गेला कुण्या माझ्या सोन्याचा तारा ।
वाजून गेले बारा बाळ अजून येअीना घरा
लेक लिहिण्याच्या तोडी तारा ॥७६५॥

मुलगा लग्नाला योग्य झाला आहे. त्याचें कौतुक--

लगीनसराअी जीव नाहीं जिवाअींत ।
बाळाचे खेळगडी नवरे झाले गांवाअींत ॥
सोनं माझ्या घरीं लावेला काय अुणं ?
माझ्या राघोबाला आली सोगअी चालून ॥

देवधर्म करण्यांत गुंतलेल्या मुलाचें कौतुक--

शंभुच्या शिखरावर बेलाचीं तीन पानं ।
तान्हं माझं बाळ पुजा केली नेणंत्यानं ॥
येलुमाअीच जत्रकरी म्यां कां वळखिल माळावरी
सोन्याचांदीच्या अब्दागिरी परशुराम त्या बाळावरी[3] ॥७६९
जेजुरीच्या वाट कुणी येळकुट बोलना ।
राघोबाला माझ्या दिवटी बुदली तोलना ॥

आअी मरीबया चहुमुलखीं तुझा झेंडा ।
माझा सदाशिव तुझ्या पालखीचा गोंडा ॥
जाअीच्या ग फुलायांचा वास सुटला कथमधीं।
तान्ह्या बाळायाच्या गजरा साधूच्या हातामधीं ॥७७२॥

शेतांत काम करणाऱ्या, गिरणींत मजुरी करणाऱ्या किंवा अितर कामें करणाऱ्या मुलाचें कौतुक--

अंजिऱ्याची बाग सर्वी स्वादिली राघोबान ।
नेणता बागवान गेला निदरा लागून ॥७७३
माळ्यान केला मळा बाळान केला अूस ।
चैत बारशीला आल्यागेल्याला पाजी रस ॥
पिकलं तुझं शेत मात गेली दिवाणांत ।
बाळा माझ्या लक्षुमणा घाल कातर लवणांतं[4]॥
हरिचंद्र वारा सुटला गंगाम्होरा ।
बाळ माझा पाडुरंग वावडीवरी हिरा ॥७७६

कितीक नवल करूं होअीवरल्या येठांनी[5] ।
पोटीच्या बाळराजा बैलामागल्या पठाणा ॥
गाअीचं गोमुतार अंगणीं झाली गंगा ।
नेणत्या माझ्या राघू दैव तुझं पांडुरंगा ॥
गाअीच्या काढी धारा म्हशीच्या खाली रेंदा।
तान्ह्या माझ्या राघू तुला साजतो गवळीधंदा[6] ॥
गायाचा गुरराखण्या म्हशीचा रामनंदी ।
सावळा माझा बाळ पवा वाजवी पानंदीं ॥

---

१ किंवा 'बोनं' व 'सोन' या ठिकाणीं अनुक्रमें 'कंवळ' व 'बाळ' असेहि शब्दप्रयोग सांपडतात.

२ मृत आअीच्या चितेभोवती पाणी शिंपडण्याचें काम मुलाचें असतें.

३ किंवा, 'येलुमाअीचं' याअैवजी 'अेका देवीचं' व चौथा चरण 'धरा आपल्या बाळावरी' असाहि मिळतो.

४ लवण = शेतांतील खोलगट किंवा अुताराचा भाग.

५ वेठण (गाडीचा सरंजाम, दोर वगैरे).

६ किंवाः— "गाअीच्या काढी धारा म्हशीच्या खाली वस ।
नेणता माझा राघू मला गवळ्यावाणी दिस ॥"

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

गाअीला गोन्हा तुझ्या शेळीला बोकड[1] ।
पोटीच्या बाळकाचं दैव बाळाचं फाकडं ॥
गाअीला गोन्हा तुझ्या शेळीला झाल्या पाठी ।
नेणत्या हरी माझ्या तुझ्या दैवाची काठी ॥
नेणत्या गायकाच्या गाया गेल्या कापसाला ।
माझ्या राघवाला वर्दी आली आकुसाला ॥
गाअी गेल्याती गायराना म्हशी खेटिती बाभळ ।
तान्ह्या राघोबाचं दळ बाळाचं येगळं ॥७८४
गाअीचं दुध लागतं तुपाअीठें[2] ।
माझ्या बाळान कुठं चारलं जंबूबेट ? ॥७८५
पानवंताच्या बायांनो पाणी भरूनी वाल्यावाल्यां[3] ।
तान्ह्या राघोबाच्या गाया गवळ्याच्या आल्या ॥
सुर्सुफळीच्या[4] पारावरी हिरवी बनात कुणाची ?
माझ्या बाळाला आली गवंडपणाची ॥७८७
सुर्सुफळींच्या पारावरी कोण निजला दोपारीचा ।
माझ्या राघोबाला शिण आला कचेरीचा ॥
सासवड गांवीच्या कचेरी संबअी जळते मैना ।
माझ्या बाळाअीचा वकिलाला माखूपणा ॥
पैक्याचं पोतं आलां म्हाराअीचा काळ ।
माझ्या बाळासंगं संग रामोशाचीं बाळं ॥
सुपभर मोतीं शिरसाबाअीच्या[5] नीऱ्याला ।
तिथ माझा राघू अुभा शिपाअी पहाऱ्याला ॥
मुकादम म्हणूनी हाका मारीत बिगारी ।
बिठ्ठल माझा अुभा साहेबाशेजारीं ॥७९२
तुझ्या पायांतील वहाण कशांन झाली काळी ।
तान्ह्या माझ्या हरीबा गिरणीवाल्याला रातपाळी ॥
गांवाला गेला कुण्या संग छत्री आअीन्याची ।
बाळांनी माझ्या रजा घेतली गिरणीमधीं महि-
न्याची ॥७९४

आअीबापांच्या या मुलग्याबद्दलच्या भावना झाल्या. परंतु त्यांच्या मुलीबद्दलच्या ज्या विशिष्ट भावना कांही ओव्यांतून व्यक्त झालेल्या आहेत त्या समजून घेणें जास्त मनोरंजक होअील. अेकंदर समाजांतील पुरुषाच्या महत्त्वाच्या भूमिकेमुळे मुलगा होणेंच जास्त पसंत केलें जातें हें वरील पुष्कळशा ओव्यांवरून स्पष्ट झालेलें आहे. तरीसुद्धा अेकदा मुलगी जन्माला आल्यानंतर कुठल्याहि प्रकारें तिची हेळसांड केली जात नाही किंवा ती कमीहि लेखली जात नाही. खालील पहिल्या दोन ओव्यांत आपली मुलगी आपल्याला मुलाच्याच तोलाची आहे, किंबहुना त्याच्यापेक्षाहि जास्तच आहे परंतु कमी नाही, असें गाणारी स्त्री ठासून सांगते. मुलीचें कुटुंबांतील व समाजांतील स्थान, तिचें परावलंबी जीवित आणि तिच्या आयुष्यांत होणारीं स्थित्यंतरें यांची जाणीव असल्यामुळेच कीं काय पण अेकदा मुलगी जन्माला आल्या नंतर तिची जास्तच काळजी केली जाते. मुलीला स्थळ कसें मिळेल याची आअीबापांना चिंता लागून राहते आणि म्हणूनच तिच्याबद्दल फार सहानुभूति दाखवली जाते. ८०२ व ८०३ या ओव्यांत मात्र बापाच्या तोंडचे मुलीबद्दल जे अुद्गार व्यक्त केलेले आहेत ते मोठे चमत्कारिक वाटतात. मुलग्याप्रमाणे मुलगी आपल्या कांहीहि अुपयोगाची नाही आणि आपण तिला जन्म दिला असला तरी तिच्या आयुष्याचे जामीन नाही असें तो दुःखाने म्हणतो. शेवटल्या ओवींत तर भरल्या बाजारांत तांदुळाच्या गोण्या विकणाऱ्या व्यापाऱ्याशीं बापाची तुलना करून अुघड अुघड त्याचा अुपहास केलेला आहे--

---

१ किंवा:-- "गाअीला गोन्हा तुझ्या म्हशीला वगारी ।
बंधवाच्या माझ्या गाअीला दैवें टाकिली आधारी ॥"

२ तुपाप्रमाणे घट्ट. ३ दूर व्हा.

४ शिर्सुफळी-- सातारा जिल्ह्यांतील अेक गांव

५ शिर्सुफळी गांवांतील स्थानिक दैवत.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

जोंधळ्यापरास किती वाढशील तुरी ?
माझी आबुबाअी लेकापरास मनपेरी ॥७९५

वाण्याच्या दुकानीं खडीसाखर मोलाची ।
बाळ माझी पार्वती बहीण भावाच्या तोलाची ॥

लअी झाल्या लेकी नको म्हणूं आअी ।
जात्याल परघरा होअील सपनाची घाअी ॥

जिवाला माझ्या वाट लेक सोन्याची सळअी ।
जाअील परघरा लागल अुन्हाची झळअी ॥

बाप म्हणे लेक हरभऱ्याची डाळ ।
जाअील परघरा माझ्या लेकीची होअील राळ ॥

बाप म्हणे लेक माझ्या गाजराचा वाफा ।
येड्या मायबापा जल्म देअूनी काय नफा ? ॥

बाप म्हणे लेकी तुला देअून आलों बाअी ।
तुझ्या जलमाचा धनी जामीन झालों नाहीं ॥

वाप म्हणे तूं लेकी तांदळाच्या गोणी[1] ।
भरल्या सभेमधीं बाप लेकी विकून झाला वाणी[2] ।

मुलगी सुस्थळीं पडावी हीच आअीबापांची अिच्छा. पण अेखादे वेळेस तिच्या योग्यते-पेक्षा कमी दर्जाचें स्थळ तिला मिळालें ही गोष्ट मागाहून लक्षांत येतेच—

हावस मला मोठी लेक पुण्यांत द्यायाची ।
जावअी वजीर घोड्यावरी आबु बाअी राधा वर्गीत यायाची ॥८०३

लअी झाल्या लेकी पित्या माझ्या मायाळूला ।
पेरिली जिरेसाळ पाग्याच्या जिव्हाळ्याला ॥

अखंड कीरकीर भिकार तुझ्या जांती ।
वाघाचं लेकरूं दिलं दरवशा तुझ्या हातीं ॥८०५॥

मुलग्याप्रमाणे मुलीबद्दलहि आअीबापांना कमी अभिमान नसतोच. कारण लग्नानंतर आअीबापांचें व घराण्याचें नांव ती आपल्या वागणुकीने दूरवर पसरवीत असते. आणि म्हणूनच कितीहि सासुरवास असला तरी तो सहन करून तिला घराण्याचा लौकिक कायम ठेवावा लागतो——

वडाअीच्या मुळ्या वडाखाली वाअूवाअूं[3] ।
लअी झाल्या लेकी विस्तार गेला गांवोगांअू ॥

थोऱ्या घरची लेक कामाच्या खसब्यांत ।
डाळुंबी माझी बाअी लवंग मसाल्यांत ॥८०७

सासुरवास केला माझ्या अुपयोगी पडला ।
नार्नां लौकिका चढला !॥८०८

रांडपण घाली वाघाच्या भुयारांत ।
आता माझी बाअी नांव केलं सोयऱ्यांतें ॥

पण अेकदा मुलगी सासरीं गेल्यानंतर मात्र आअीबापांना तिची किती ओढ लागून राहते पाहा——

नदीच्या पल्याल लेक देअून झाली येडी ।
सांगड्याला हात जोडी[6] ॥८१०

सांगावा धाडीतें आल्यागेल्याला गाठयीत ।
माझ्या ग बाअीच्या सांगा ग वाड्यांत ॥

गांवोगांवीची वाट पुशितें बामणाला ।
डाळुंबी कस्तुरीबाअी बाबअी दिली गोविंदाला ॥

बाळाला बोलतें जा बाअीला आणाया ।
येळाचा येळ गेला गाडी खिडक्याची विणाया ॥

जीवाला जड भारी सोयऱ्या माणसाला काय ?
डाळुंबी माझी बाअी हरणी अुचल विगी पाय ॥

---

१ तांदुळाच्या शुभ्रपणामुळे कुलीन स्त्रीला ओव्यांतून पुष्कळदा तांदुळाची अुपमा दिलेली असते. ('धुतल्या तांदुळासारखें स्वच्छ चारित्र्य' हा वाक्प्रचार आहेच.)

२ मराठा, महार वगैरे जातींत लग्नांमध्ये मुलीचा बाप मुलाकडून पैसे घेतो या चालीस अुद्देशून ही ओवी रचलेली आहे. ३ लांबवर पसरलेल्या. ४ बाप.

५ मुलीला वैधव्य आल्याने अत्यंत कठिण परिस्थितींत दिवस काढावे लागले तरीसुद्धा आपल्या वागणुकीने तिने नांव मिळविलें.

६ किंवा— "नदीच्या पल्याल लेक देअूनी फसली ।
नित नावांत बसली ॥"

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मोठ्या मुलीवरून गाअीलेल्या खालील प्रकारच्या स्तुतिपर ओव्या मिळतात--

बाप म्हणे तूं लेकी माझी शीतागीता ।
आवडीन हाका मारी माझ्या आवडीच्या रघु-
नाथा ॥८१५
सोनं झालं स्वस्त चांदी कशान महागली ?
माझ्या आबुसाठी मला आगत लागली ॥
बारीक तुझा गळा किन्नरावरी चाल ।
वाणीची माझी बाअी राघूमैना आंत बोल ॥
साठाच्या सुगरणी आल्यात हारवाया ।
डाळुंबी माझी बाअी लाव कांदा कुरवाया ॥
पाया पडूं आली नाही कपाळ झिजत ।
जातीच्या लेकराला नाही सांगावं लागत
॥८१९॥

---

# रद्दींतील रत्नें

## सुरदासाचें मराठी पद

[सुरदासप्रभु हा हिंदी कवि १५ व्या शतकांत अुत्तर हिंदुस्थानांत होअून गेला. त्याचीं हिंदी पदें लोकांच्या तोंडीं आहेत. पण त्याने मराठींत पद्यरचना केल्याचें माहीत नाही. त्याच्या नांवावर असलेलें पुढील पद अेका जुन्या बाडांत सांपडलें.]

अपराध पोटिं घाल राधे तूं अपराध पोटिं घाल ॥धृ॥ तुजला त्यागुनि अंन्य स्त्रियाशि ॥ केले जे बहु ख्याल ॥ राधे तुं अपराध० ॥१॥ गृहपशुधन तें कांहिं नको गे ॥ अधरांमृत मुखिं घाल ॥ राधे तू अपराध पोटिं घाल ॥२॥ येअीं गे राधे येअी गे राधे । विलपतसे बहु काल ॥ राधे तुं अपराध० ॥३॥ तुझिया वियोगें लव पळ जातो ॥ होतो युगसमकाल ॥ राधे तुं अपराध० ॥४॥ सुरदासप्रभु प्रार्थितसे तुज होअुनिया कनवाळ॥ राधे तूं अपराध पोटिं घाल॥५॥

चिं. ग. कर्वे

---

१ किंवा:-- "किती हाका मारूं लेकी तुला शीतागीता ?
माझ्या सदाशिवा माझ्या नवसाच्या अेकनाथा ॥"

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# रामायणी गीतांचें प्राचीनत्व व कर्तृत्व

(लेखक— दत्तो वामन पोतदार)

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या अंक ६० (वर्ष १४, अंक ४) मध्ये कु. अनसूया भागवत यांनी जमविलेल्या गाण्यांचा अेक हप्ता आला आहे. पत्रिकेचे संपादक श्री. के. नारायण काळे यांनी हीं गाणीं आपल्या मातुश्रींकडून मिळविलीं होतीं. कु. भागवत यांनी जो गीतांचा संग्रह चालविला आहे तो अत्यंत अुपयुक्त आणि अभ्यसनीय आहे. अशा गीतांचा काळ ठरविणें हें फार अवघड काम आहे. सौ. अिरावती कर्वे यांनी जो महाराष्ट्रांतील जातींचा सामाजिक अभ्यास चालविला आहे त्यांत त्यांनाहि जुन्या गीतांचा अुपयोग होत असतो. त्यांच्या अेका व्याख्यानप्रसंगीं अेका अभ्यासकाने अशी शंका प्रकट केली होती की जोवर या जुन्या गीतांचा काळ निश्चित करतां येत नाही तोवर त्यांच्या आधारें शास्त्रीय अनुमानें काढणें अयुक्त होअील. शंकेचा रोख बरोबर आहे. असलीं जुनीं गीतें लिखित स्वरूपांत अद्यापि आढळलीं नाहीत; आणि आढळण्याचा संभवहि बराच कमी आहे; त्यामुळे लिखित स्वरूपांच्या आधारें कालनिर्णय करण्याचें अेक अुपयुक्त साधन या प्रकरणीं अभ्यासकांच्या हातीं अुपलब्ध नाही. अशा अडचणीच्या स्थितींतहि पठित स्वरूपांत अुपलब्ध होणाऱ्या या गीतांची भाषा व शब्दप्रयोग आणि त्यांत अुल्लेखिलेल्या चालीरीति वगैरेंच्या पृथक्करणाच्या साहाय्याने ढोबळ कालनिर्णय, सर्वच ठिकाणीं नाही तरी, कांही ठिकाणीं तरी बऱ्याच निश्चयाने करतां येण्यासारखा आहे. पठित परंपरेचे दोष या निर्णयाच्या कामींहि अभ्यासकाला आड येतील हें अुघड आहे. वैदिकांनी ज्याप्रमाणे आपल्या पठनपरंपरेंत आपल्या संहिता अगदी शुद्ध राखण्याचा आटोकाट प्रयत्न केला आहे तसा प्रयत्न जुनीं गीतें आणि अभंगादि पठित परंपरावलंबित मराठी वाङ्मय यांच्या संबंधांत झालेला नाही याला अुपाय नाही; तथापि येथेंहि बुद्धि चालवून कालनिर्णयाचा प्रयत्न होअील तोवर केला पाहिजे.

कु. अनसूया भागवत यांनी आजवर छापलेल्या गीतांत रा. काळे यांच्याकडून अुपलब्ध झालेलीं जीं रामायणविषयक गीतें म. सा. पत्रिकेच्या वरील ६० व्या अंकांत दिलीं आहेत तीं आम्हांस कालदृष्ट्या भागवत यांनी प्रसिद्धिलेल्या संग्रहांत सर्वांत जुनीं वाटतात. असें वाटण्याचीं कारणें थोडक्यांत येथे नमूद करीत आहें.

(१) या गीतांत चित्रलेखनाचे अुल्लेख बरेच आले आहेत. चित्र 'लिहिणें' असाच प्रयोग चित्र काढणें या अर्थी केला आहे. चित्र लिहिणें हा शब्दप्रयोग जुन्या संस्कृत वाङ्मयांतील शब्दप्रयोगाशीं समान आहे. भिंती घोट करणें, घोटें घोट करणें, हिंगोळ सारवणें या क्रियांचाहि जो अुल्लेख या गीतांतील चित्रलेखनप्रसंगांत आला आहे त्यावरूनहि प्राचीन चित्र काढण्याची पद्धत रूढ असतांना हें गीत तयार झालें असें अनुमान करतां येतें. अधिक स्पष्ट विधान करावयाचें तर या प्रमाणांच्या आधारें या गीतांचा काल शके १६५० च्या सुमाराचा स्थूल मानाने धरण्यास हरकत नाही. 'तसबीर काढविणें' असा शब्दप्रयोग पेशवेकालीन वाङ्मयांत सांपडतो. रामदासांनी 'त्यांच्या सुरता करूनि ठेविती'. असा प्रयोग केला आहे. तसबीर किंवा सुरत हे फारसी शब्द न वापरतां चित्र लिहिणें असा या गीतांतील शब्द-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रयोग पाहतां तें शक १६५० च्याहि मागच्या काळांतील आहे असें म्हणण्याकडे कल होतो.

(२) 'पालव सरसा केला' म्हणजे पदर सावरला असा शब्दप्रयोग या गीतांत आढळतो. तोहि या गीताचा प्राचीनपणा ठरविण्यास पोषक आहे. याहिपेक्षा कोणी मंडळी आली असतां त्यांना 'बैसकार' दिले असें दोन वेळां या गीतांत आलें आहे. हा शब्दप्रयोग तर निःसंशय शिवपूर्वकालीन आहे, म्हणजे या गीतांची प्रचीनता शक १६५० च्या मागे शे-दीडशे वर्षे नेण्यास चिंता नाही. तसेंच 'पाटाळू वरता दूणिला', 'तूं भला विंधणी', 'आर्वाळी मांडिती', 'भीअुर दाखविला', 'जिव्हारी खोचला' 'शुद्ध करावी' (जसें सीताशुद्धि) असे जे अनेक शब्दप्रयोग या गीतांत आले आहेत तेहि त्याच्या प्राचीनत्वाला पोषकच आहेत. अेका ठिकाणीं तर 'तव ते तातोबांनी मर्दन मांडीयेला दोन्ही' असा चरण आहे. यांतील 'मर्दन' शब्द हा महानुभावी वाङ्मयांत मर्दना किंवा मादन म्हणजे स्नान या अर्थी अनेक वेळां येतो. लवांकुशाला स्नान घालून तातोबांनी त्यांना लेखण्या पाट्या घेअून ओनामा शिकविण्यास प्रारंभ केला असें गीतकार म्हणतात. हा 'मर्दन' शब्दाचा प्रयोग गीताचें प्राचीनत्व आणखीहि मागे नेण्यास समर्थ आहे. 'तव ते नागोबांनी वरती आयती मांडिली। सतरंग डाळ रत्नखचित भूज केली' या चरणांतहि 'आयती मांडिली' (तयारी केली) हा शब्दप्रयोग व 'डाळ' (ढाळ = तेज) हा शब्द हे या गीतांचा जुनाटपणाच पुष्ट करतात.

कालनिर्णयास चालीरीतींच्या अुल्लेखाचेंहि किंचित् साहाय्य होअूं शकेल, परंतु भाषाप्रयोगापेक्षा चालीरीति अधिक स्थिर असल्यामुळे व्हावा तितका लाभ पदरांत पडणार नाही. कैकेयीला रेड्यावर बसविली 'आणि सात पाट काढून काळ्या बैलाला जुंपली किंवा सीतेची भेट घेतांना तुपाची वाटी भरून त्यांत रूप पाहून मग भेटी घेतल्या; श्रीरामाला पुत्र झाला त्या वेळीं श्रीरामाच्या मांडीवर सुवर्णमहाळुंग पडलें व कैकेयीने अवदसेचें रूप घेअून परडींत दिवे लावून रामाला ओवाळलें अित्यादि चालीरीतींचे अुल्लेख या गीतांत आहेत तेहि त्यांच्या जुनेपणास पोषकच समजतां येतील.

असो. या गीतांच्या कर्त्यासंबंधाने कांही निश्चयाने सांगणें कठिण आहे. अेकाचा कर्ता विनायक रघुनाथ व दुसऱ्याचा कर्ता लख्या सदबा हे असावेत आणि दोघे अनुक्रमें ब्राह्मण व गोंधळी असावेत असें अनुमान कु. भागवतांनी केलें आहे. पैकी विनायकाचा अुल्लेख असलेले जे दोन चरण गीतांत आढळतात ते नामवाचक धरले तरी त्यांतील रघुनाथ हें पद कवीच्या नांवाशीं संयुक्त करणें विशेषसें योग्य होअीलसें वाटत नाही. रघुनाथ हा त्या चरणांतील अुल्लेख रामवाचक आहे. या गीतांत ठाकुराचा अुल्लेख स्पष्टपणें आला आहे तो विशेष लक्ष्यांत घेण्यासारखा आहे. श्रीरामाचें सभेंत 'ठाकूर गेला सांगाया' हा अुल्लेख ठाकूर, चारण, भाट वगैरे जे लोक क्षत्रियांशीं संबद्ध असत त्यांस अनुसरून आहे आणि त्याचें म्हणजे अंकुशाचें मूळ पुसायला चंपा ठाकूर पाठविला असा या गीतांतील अुल्लेख वाचला म्हणजे तें गीत करणारा कोणीतरी ठाकूर असावा असें मानण्याकडे कल होतो. ठाकूर मंडळी ही कित्येक जातींमध्ये पुरोहित म्हणून अद्यापहि कामें करतात. त्यांजपाशीं वंशावळी वगैरे संग्रह असतो. नाशिक जिल्ह्यांतील ब्रह्म क्षत्रिय ठाकूर हे लेखकाचेंहि काम करतात. सातारा जिल्ह्यांतील ठाकूर आपणांस गंगाराम भाटांचे वंशज म्हणवितात. ठाकूरांच्या बाडांत भाट मंडळींची कवनें विपुल आहेत. ठाकूरहि हीं कवनें करीत असावेत. तसें असल्यास संदरहू गीतांचा कर्ता अेखादा ठाकूर असणें अधिक संभवनीय वाटतें.

---



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# संहिता–चिकित्सा

(लेखक— श्री. ग. वा. तगारे)

सुमारे तीन वर्षांपूर्वी "राष्ट्रकूटकालीन मराठी" संबंधी वाचन करीत असतां, १३ व्या शतकांतील मुकुंदराज, ज्ञानेश्वर, नामदेव अित्यादि संतकवींच्या संहितांचें स्वरूप पाहून मन अुद्विग्न झालें. वेळीं अवेळीं ज्यांच्या नांवांचा आपण जयघोष करतों, ज्यांच्या लेखनास आपण 'महाराष्ट्रवेद', म्हणून गौरवतों, त्यांचें व्यक्तित्व व्यक्त झालेल्या लिखाणाच्या पावित्र्याबद्दलचें आपलें औदासीन्य पाहून खेद वाटतो. नामदेवांच्या अभंगांत १५ व्या शतकांतील रूपें असावींत आणि मुकुंदराजांच्या ग्रंथांचें त्याहूनहि अर्वाचीकरण व्हावें ही संहितीकरणानन्तर रूढ झालेल्या वैदिक वाङ्मयरक्षणाच्या परंपरेची थट्टा आहे का अज्ञान आहे समजत नाही.

वस्तुत: हा अेक जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. समर्थांनी समाधिस्थ होण्यापूर्वी दासबोधास आपलें स्वरूप समजण्याचा दिलेला आदेश भाषाशास्त्राच्या दृष्टीने सुद्धा महत्त्वाचा आहे. भाषिक दृष्ट्या अेकट्या मराठीचा किंवा अर्वाचीन भारतीय आर्यभाषांचा साकल्याने अभ्यास करतांना भाषिक विकासाचा अैतिहासिक दृष्ट्या विचार करणें आवश्यक असते[1]. पण मराठीच्या अैतिहासिक व्याकरणाचीं साधनें– जुन्या ग्रंथांच्या संहिता–जर अशुद्ध स्वरूपाचीं असतील तर त्यांवरून निघणारे निष्कर्ष संशयित स्वरूपाचे राहणार हें अुघड आहे. सारांश शास्त्र व भावना या दोन्ही दृष्टींनी प्राचीन ग्रंथांच्या चिकित्सित आवृत्त्या (critical editions) निघणें अत्यंत ज़रूर आहे. या काढतांना निर्माण होणाऱ्या कांही प्रश्नांचा विचार मी थोडक्यांत करीत आहें. ही चर्चा प्राथमिक स्वरूपाची समजून मराठी हस्तलिखितांत जे कांही विशेष प्रश्न निर्माण होतात त्यांबद्दल मराठी हस्तलेख अभ्यासण्यांत ज्यांनी अनेक वर्षें घालविलीं आहेत अशा प्रा. पोतदार किंवा त्यांच्यासारखे अितर जे विद्वान असतील त्यांनी लक्ष घालून याबद्दल अधिकारसंपन्न असें लेखन करावें अशी विनंती आहे.

प्राचीन काळापासून आपल्याकडे ग्रंथसंपत्ति मुखोद्गत करण्यावर जास्त भर असल्यामुळे भारतीय लेखनकला सिंधु-संस्कृति[2] अितकी जुनी असूनसुद्धा आपली परंपरा युरोपियन लेखनपरंपरेअितकी शुद्ध स्वरूपांत राहूं शकली नाही. 'दुर्वाच्यानि श्रोत्रियाक्षराणि[3]' हें केवळ अक्षराच्या

---

१ ही दृष्टि राहिली नाही तर कशी फजगत होते याचें अेक अुदाहरण देतों. पॉल थाअीम (Paul Theime) यांनी आपल्या Indische Wörter und Sitte या निबंधांत 'पूजा' शब्द अथर्ववेदांतील 'पृच्' धातूपासून व्युत्पादून त्याचे *पृच्ञां (कृ)- *पुञ्चां- *पुञां- *पुज्जां- पूजां (कृ) असे मधले टप्पे दिले आहेत. सकृद्दर्शनीं यांत असंभाव्य कांहीच नाही. अडचण अेवढीच आहे की अनुनासिकानंतर च् चा ज् होणें (*पुञ्चां- *पुञ्जां) व संयुक्त व्यंजनाआधीचा स्वर दीर्घ होअून संयुक्ताचें साधें व्यंजन होणें (*पुज्जां –पूजां) या भाषिक प्रवृत्ति 'पूजा' शब्द आढळणाऱ्या जैमिनीय अुपनिषद् ब्राह्मणाअितक्या जुन्या नाहींत. पहिली प्रवृत्ति अशोकाच्या शिलालेखांत (खि. पू. ३ रें शतक) सुद्धा आढळत नाही.

२ मार्शल् Mohenjo Daro I पृ. ४०. तसेंच मॅके– Indus Civilization पृ.१३,

३ मुद्राराक्षस,

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

वळणापुरतें खरें नसून लेखनशुद्धतेलाहि लागू पडतें, हें आज दशग्रंथी वा अितर शास्त्रांत पारंगत असलेल्या प्राचीन परंपरेतील विद्वानांच्या खासगी लिखाणांत दिसून येअील. प्राचीन मराठी वाङ्मय सामान्य जनतेला सुबोध असण्याच्या काळांत अर्वाचिलें जाण्याचा बराच संभव आहे. वेदवाङ्मयांतसुद्धा फार प्राचीन काळीं असें मिश्रण व अर्वाचीकरण झालें होतें.[४] सारांश, ग्रंथकाराचें स्व-लिखितें (autograph)[५] किंवा त्याला कालदृष्ट्या अत्यंत निकट असलेली प्राचीनतम प्रत (archetype) अुपलब्ध नसेल तर मुखपरंपरा व लेखपरंपरा यांवर विश्वासण्यापूर्वी ग्रंथसंपादकाने मूळ ग्रंथांतील शब्दन् शब्द तैल दृष्टीने निरखून व चिकित्सक बुद्धीने पारखून घेणें ज़रूर आहे.

याचा अर्थ असा नव्हे की लेखक[६] (copyists) लेखनशुद्धतेबद्दल निष्काळजी असत. पण प्रकाशलेखनादि यांत्रिक साहित्याच्या अभावी लेखकांचा मानवीपणाच आदर्श प्रतीच्या[७] (exemplar) नकलेंतील न्यूनाधिक्यास कारणीभूत होअी. संस्कृत प्राकृत-ग्रंथांतील पाठभेदांप्रमाणे ज्ञानेश्वरी-दासबोधादि ग्रंथांचे पाठभेद तपासतांना हीच गोष्ट कारणीभूत आहे असें आढळून येअील..

या चुकांचीं मुख्य कारणें तीन आहेतः— (अ) आदर्श प्रतींतील (Exemplar) कांहीं घोटाळे सुधारण्याचा प्रयत्न करणें; (आ) मूळांतील कांहीं भाग- अक्षरें, शब्द, वाक्यें अि.-गाळणें; (अि) नजरचुकीने वा अन्य कारणांनी पदरची भर घालणें.

या चुकांचें कांहीं ठळक प्रकार अुदाहरणांसह देतों. हीं अुदाहरणें मुख्यतः तोडरमलसंपादित महावीरचरित (भवभूतिविरचित), महाभारत व दासबोध या ग्रंथांतील आहेत. या ग्रंथांचीं संक्षिप्तें पुढे दिल्याप्रमाणे आहेत- म. च. = महावीरचरित, म. भा. = महाभारत, दा. डो. = दासबोध (डोमगांव प्रत), दा. शि. = दासबोध (शिरगांव प्रत). शके १२७२ मधील ज्ञानेश्वरीचें हस्तलिखित माझ्यासमोर नसल्यामुळे मला ज्ञानेश्वरींतील पाठभेदांचा अुपयोग करून घेतां आला नाही. ज्ञानेश्वरीचर्चामंडळाने या पाठभेदांचे वर्गीकरण केलें तर बरें होअील.

(१) **अक्षरसाम्य**—जुन्या पोथ्यांतील कांहीं अक्षरें दुर्बोध असतात तर कांहींमध्यें—प आणि य, ण आणि प— घोटाळा अुडण्याअितकें साम्य असतें; अुदा० म. च. I.4c मध्ये 'वाक्यनिष्यन्द' बद्दल— 'निप्पन्द' असा पाठ आहे आणि III. 40d 'कल्पापाय'— व 'कल्याणाय' यांचा घोटाळा अुडालेला आहे. दासबोध ६.५.१ 'श्रोत्यावक्त्यांचा' (डो.) व श्रोतयावक्तयांच्या (शि.) हा जोडाक्षर काढण्याच्या पद्धतीमुळे पाठभेद असावा. दा. ११.५.८ संबंध पडो नेदावा। अति परि तयाचा (डो.) —अतिपरिच्त्रयाचा (शि.) येथे त आणि चचा घोटाळा असावा?

---

४ वाकरनागेल- Altindische Grammatik पृ. X-XXII. Les consonnes inter vocaliques en vedique या निबंधांत मेय्यांचें तसेंच मत आहे (IF XXXI पृ. १२० व पुढे). त्यांच्या म्हणण्याचा गोषवारा ब्लोकनो आपल्या मराठीवरील पुस्तकांत दिला आहे (FLM§२).

५ हें हस्तलिखित खुद्द ग्रंथकाराच्या हातचें नसून त्याने अधिकृत केलेल्या लेखकाने (अुदा० ज्ञानेश्वरांचा लेखक सच्चिदानंद) लिहून ग्रंथकारास पसंत असले तरी त्यास autograph म्हणतात.

६ प्रस्तुत लेखांत copyist ला 'लेखक' आणि author ला ग्रंथकार, ग्रंथकर्ता पुस्तककर्ता हे पर्याय योजले आहेत.

७ ज्या प्रतीवरून ग्रंथाच्या अधिक प्रती तयार करतात आणि पुढील प्रतींचा जो आदर्श वा मूळ प्रत समजण्यांत येते त्याला Exemplar म्हणतात.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

म. भा. च्या आदिपर्वांत शारदालिपि व देवनागरी यांच्यांतील अक्षरसाम्यामुळे म आणि स, त्त आणि न्न, श्य आणि श्च यांचा गोंधळ अुडालेला आढळतो. जैन पोथ्यांत व आणि व्र, ब्म आणि ज्झ अित्यादींची अदलाबदल होते. पण हा अेका स्वतंत्र शास्त्राचा– Palaeography चा– प्रांत आहे.

कित्येकदा काना, मात्रा, अुकार, वेलांट्या ओळखतां न आल्याने चुका होतात; अुदा० म. च. II. 13 3 मध्ये 'महादोसो' अैवजी 'महादासो' असा पाठ आहे. दासबोध १-३.१९ 'जयेसि स्तविति (डो.)– 'जयेस–' (शि.), दासबोध ४.१०.१४ 'वेष्टित' राहिले (डो.) 'वेष्टीत' (शि.) दा.१६. ६.११ मेघ अुठिलें लाककाजा अैवजी शि. प्रत 'लोककाजा' अशा किरकोळ फरकांची यादी पुष्कळ मोठी होअील.

(२) **अक्षरव्यत्यास** (anagrammatism) किंवा अक्षरांची अुलटापालट; अुदा० म. च. III,37.d मध्ये 'ज्ञानेन चान्यः' अैवजी* ज्ञाने न चान्यः असें वाचलें जाअून 'ज्ञाने च नान्यः' असा पाठ आला.

(३) **अक्षरप्रक्षेप**— कधी कधी अुगीचच पदरचीं अक्षरें घातलीं जातात; अुदा० म. च. I. 2 a 'महापुरुषसंरंभो' अैवजी 'समारंभो' असा पाठ आहे. दा. डो. ५.५.१६ 'मूर्तीची परीक्षा' अैवजी मूहुर्ताची परीक्षा' (शि.) तसेंच दा. डो. ५.६.६ 'सर्वसाक्षी अवस्था तुर्या' बद्दल 'सर्वसाक्षिणी' (शि.) हा पाठ.

(४) **अक्षरलोप** (Haplography) व (Homoeographon)–कित्येकदा प्रारंभीं किंवा शेवटीं अक्षरांच्या सारखेपणामुळे कांही अक्षरांचा लोप होतो; अुदा० म. मा. I. 103,13 o मधील * अभ्यसूययाम् बद्दल 'अभ्यसूयाम्' हा पाठ (Haplography) चें अुदाहरण म्हणतां येअील. लेखनसाम्यामुळे होणारा लोप (Homoeographon) समजतात; अुदा० म. च. II.7[2] 'लोलल्लोअणो' अैवजी 'लोलअणो' किंवा म. च. III. 19[3] 'प्रसवपांसन' बद्दल 'प्रसवासन' हे पाठ. अक्षरलोपांचीं दासबोधांतील अुदाहरणें ११-१.३४ जाणतो जीव तो प्राण (शि.) बद्दल 'जातो जीव तो प्राण' (डो.) 'नेणे जीव तो अज्ञान' ही पुढील ओळ लक्षांत घेतां शिरगांवकरप्रतीचा पाठ बहुधा मूळ असावा असें वाटते. दा. डो. ४.४.१८ मधील नाना समाधाने पाहतां । बद्दल शिरगांवप्रतींतील 'साधनें' हा पाठ ४.४.१७ ही ओवी लक्षांत घेतां अक्षरलोपामुळें असावा काय ?

(५) **पुनरुक्ति** (Repetition किंवा Dittography).

अुदा० म. मा. I.57.21 मधील हास्यरूपेण शंकरः। अैवजी 'हाम्य हाम्य' अशी (स्य अैवजी म्य चा घोटाळा अुडून) 'हास्य' ची पुनरुक्ति झाली आहे.

(६) नजरचुकीने कित्येकदा शब्द वा अक्षरें गळतात; अुदा० म. च. II.9.9 'अभिचरन्ति' अैवजी 'अचरान्ति.'

**कांही अैच्छिक वा अनैच्छिक दोष**:पुढे दिलेले अपपाठ अक्षरांच्या घोटाळ्यामुळे नसून लेखकाकडून थोडेबहुत जाणूनबुजून होतात.

(१) **पदव्यत्यास**— शब्दांतील विभागांचा वा शब्दांचा स्थानव्यत्यास; अुदा० दा. ९.६.४७ फळीं फुली लगडले। सावकाश (डो.) बद्दल– फुलीं फळीं लगडले। (शि.). तसेच पुढे दा. ९.६.४९ 'जळरूप फळ' (डो.) बद्दल 'फळरूप जळ' (शि.). दा. १०.७.५ मध्ये 'सद्यप्रचीति रोकडी पाहावी– (डो.) अैवजी 'रोकडी प्रचीति सद्य पाहावी' (शि.) हे पाठ.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

(२) लेखकास लिहितांना अेखादी ओळ वा श्लोक गळला असें आढळतांच तें पान वायां न घालवतां तो तेथे काकपदासारखी खूण करून पृष्ठसमासांत वा पायटीप म्हणून ती ओळ लिहितो. पण ती पोथी आदर्श ठेवून लिहिणारा पुढील लेखक ती खूण विसरून मूळ पंक्ति वा श्लोक संदर्भरहित, मलल्याच ठिकाणीं घुसडतो. दासबोधाच्या शिरगांवप्रतींतील ८.४ मधील ८-१३ ओव्या दुवार लिहिल्या जाणें किंवा ८.५ मधील बऱ्याच ओव्या पुढे मागे होणें लेखकाच्या दुर्लक्षाचें द्योतक आहे. कर्पूरमंजरी नाटकाचें प्रथमाकांत T हस्तलिखितांत २ व ४ श्लोकांची अुलटापालट अशाच कारणांनी झाली.

(३) जुन्या पोथ्या शब्द न तोडतां लिहिल्या गेल्यामुळे शब्द चुकीने जोडले व तोडले जातात. दा. ११.५.८ 'संबंध पडो नेदावा। अति परी तयाचा' (डो.) बद्दल 'अतिपरिचयाचा' (शि.) तसेंच दा. डो. ६.४.१७ 'लहानथोराचा निर्धार' अैवजी 'लाहान थोर हा निर्धार।' (शि.). दा. डो. ७.४.५२ योगी जना येकांत। जागी 'योगीजनांचा अेकान्त' (शि.) हे पाठ

(४) अेकाच वा विरुद्ध अर्थाचीं विशेषणें अेकमेकाअैवजी वापरल्याची अुदाहरणें डॉ. सुखठणकरांनी म भा. आदिपर्वाच्या प्रस्तावनेंत दिलीं आहेत (पृ.XXXVIIपाहा) त्यावरून नरेश्वर– नराधिप, नरोत्तम– नरर्षभ अशा विशेषणांचीं अदलाबदल होते असें दिसतें.

(५) कधी कधी लेखक कमी महत्त्वाचे शब्द गाळतो किंवा घुसडतो तर कित्येकदा आदर्श प्रतीशीं संबंध नसलेले शब्द तो लिहीत असतो. दासबोधाची डोमगांवप्रत वा शिरगांवप्रत मूळ धरली किंवा या दोन्ही प्रती समर्थांच्या स्वलिखितावरून केल्या गेल्या असें मानलें तरी दा. ४.२.२८ 'कीर्तनें वाचा पवित्र' (डो.) व 'कीर्तनें दोषाचा देह पवित्र' (शि.) किंवा दा. ९.४.१६ 'कुशळता नाहीं तर्क नाहीं। प्राणिमात्रासि– (डो.) व 'व्याप नाहीं वैभव नाहीं' (शि.) हे पाठभेद कोणत्या तरी लेखकाच्या चुकीमुळे आले असावे. समर्थांनीच जर दासबोधाची दुसरी आवृत्ति काढतांना केलेल्या सुधारणा अेका प्रतींत येअून दुसऱ्या प्रतींत जुना पाठ राहिला असेल तर गोष्ट निराळी

जुन्या संस्कृत-प्राकृत पोथ्यांतील पृष्ठसमासांत दिलेल्या अर्थविषयक टीपा (marginalia) ग्रंथांतील मूळ संहितेंत घुसडल्या जातात.

प्रक्षिप्तें (Interpolations)-आदर्श प्रतींतील न्यूनाधिक्य नाहींसें करून ती सुधारण्याचा तर कधी आपल्या मतास आधार मिळवण्याचा केलेला बुद्धिपुरःसर प्रयत्न प्रक्षिप्तांस कारणीभूत असतो. आदर्श प्रतींत कांही भाग घुसडणें किंवा गाळणें हें प्रक्षिप्त या सदरांत येते. याबद्दल लेखक जबाबदार नसून ग्रंथाचे प्राचीन संपादक (redactors of Mss) असतात. ग्रंथांतील याद्यांत अधिक भर घालणें, वर्णन सविस्तर करणें, गोष्टीसंवादांची पुनरुक्ति, सुभाषितें वा अर्थान्तरन्यास घालणें, स्वमतास पोषक भर, आदर्श प्रतींतील विरोधी भागांचा समन्वय करणें, रंगभूमीवर नाटक बसवण्यासाठी केलेले फेरफार या गोष्टी गरीब लेखक बहुधा करू शकत नाही. प्राचीन संपादक (readactors of Mss.) या गोष्टींबद्दल जबाबदार धरले पाहिजेत.

---

८ सुखठणकर– म. भा. आदिपर्व Prolegomena XXXVIII.

९ अुदा० रामायण R. 1.5.27. २०-२२ रामानुजमतानुयायांचा भाग.

१० अुदा० म. भा. मुंबअी प्रत १३९ वा अध्याय (App. I. No. 80 म.भा.चिकित्सित आवृत्ति.)

११ अुदा० शाकुंतलाच्या संहिता.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

याखेरीज गाळलेले शब्द मरणें, वृत्तदुरुस्ती, जुने किंवा दुर्बोध शब्दप्रयोग बदलणें अथवा कांही उघड उघड असलेले दोष (Solecisms) सुधारणें या गोष्टी हे संपादक करितात.

सारांश, स्वलिखित (autograph) उपलब्ध नसेल तर परंपरागत आलेल्या पोथ्यांत अितक्या तऱ्हेचा गोंधळ असल्यामुळे सापडेल ती किंवा त्यांतल्या त्यांत जुनी पोथी घेऊन छापणें म्हणजे ग्रंथसम्पादन नव्हे हें लक्षांत येअील.

**चतुरंग चिकित्सा**—अशा परिस्थितींत आपल्यासमोर असलेल्या हस्तलिखितांच्या व इतर पुराव्यावरून सारासारविचार करून मूळ ग्रंथकाराचे कोणते पाठ असावे हें निश्चित करण्याच्या पद्धतीला संहिताचिकित्सा (Text-criticism) म्हणतात. हिचीं चार अंगें आहेत.

(१) वर्गीकृत संकलन (Heuristics)— कोणत्याहि ग्रंथाच्या सर्व परंपरेंतील हस्तलिखितें व इतर अप्रत्यक्ष पुरावे (Testimonia) संकलित करून त्यांचा परस्परांशीं संबंध निश्चित केल्यावर त्यांचा संबंधदर्शक वंशवृक्ष (Stemma Codicum) तयार करणें.

(२) **संहितीकरण** (Recensio)—वरील पुराव्यावरून ग्रंथाची प्राचीनतम संहिता ठरवणें.

(३) **पाठ शुद्धि** (Emendatio)— प्राचीनतम संहिता निश्चित केल्यावर त्यांतील पाठ तपासून ग्रंथकाराचें स्थल, काल, विद्वत्ता, तत्कालीन इतर वाङ्मय इ. गोष्टी लक्षांत घेऊन शुद्ध पाठ कोणता असावा हें तर्कानें बसवून योजणें.

(४) **संदर्भनिश्चिति** (Higher Criticism)—ग्रंथकारानें वापरलेले संदर्भग्रंथ, त्यानें केलेल्या उसनवारीचीं स्थळें व माग शोधून काढणें.

या चतुरंगचिकित्सेनें निश्चित केलेली संहिता शास्त्रीयदृष्ट्या विश्वसनीय समजण्यास कांहीच हरकत नसावी.

**वर्गीकृतसंकलन**—प्रथमतः कोणत्याहि प्राचीन ग्रंथाच्या महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांतील मठांतून, संतांच्या किंवा त्यांच्या शिष्यप्रशिष्यांच्या घराण्यांतून, तसेंच क्षेत्रस्थ प्राचीन घराण्यांच्या दप्तरांतून शोध करून मिळतील तितक्या परंपरांचीं हस्तलिखितें आपण मिळविलीं पाहिजेत. मराठी हस्तलिखितांच्या वर्णनात्मक याद्या (Descriptive catalogues) अजून फारशा अुपलब्ध नाहीत. माझ्या माहितीप्रमाणे तंजावरच्या सरस्वतीमहाल ग्रंथालयांमधील मराठी हस्तलिखितांच्या वर्णनपर यादीचा पहिला खंड १९२९ सालीं प्रसिद्ध झाला. धुळ्याच्या समर्थवाग्देवतामंदिरांतील संस्कृत-मराठी हस्तलिखितांच्या अशा याद्यांचे दोन खण्ड 'श्रीरामदास-संशोधन' या नांवानें १९३३ व १९३८ मध्ये प्रसिद्ध झाले. भारतेतिहाससंशोधक मण्डळ पुणें, किंवा वऱ्हाडमधील शारदाश्रम अशा महाराष्ट्रीय संस्थांनी व मराठी संस्थानांनी आपापल्या संग्रहांतील हस्तलिखितांच्या याद्या प्रसिद्ध केल्या तर बरें होईल.

यानंतर त्यांतल्या त्यांत प्राचीनतम व विश्वसनीय (कारण सर्वच प्राचीन हस्तलेख विश्वसनीय नसतात) प्रतींतून अभंगाचा अेक चरण किंवा ओवी मूळ प्रतीप्रमाणे अक्षरशः हस्तलिखितांच्या तुलनात्मक अभ्यासासाठी मुद्दाम आंखून घेतलेल्या लहान लहान चौकटी असणाऱ्या कागदावर प्रत्येक चौकटींत अेक अक्षर याप्रमाणे अुतरून, त्याच्या खालीं अेक विशिष्ट क्रम ठरवून ठेवलेल्या आपल्याजवळील सर्व हस्तलिखितांतून प्रत्येक अक्षर तपासून त्यांतील न्यूनाधिक्य त्या त्या अक्षराखालील त्या हस्तलिखिताच्या नांवासमोरील चौकटींत नोंदणें हें पहिलें काम आहे. त्याच पानावर अुजव्या हातास 'कांही विशेष' म्हणून सोडलेल्या सदरांत आपल्यास अेखाद्या पाठभेदाबद्दल कांही म्हणावयाचें असल्यास म्हणावें. हस्तलिखितांचा तौल-

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

निक अभ्यास किंवा लेख-तुलना (Collation) पुरी झाल्यावर आपणांस या हस्तलिखितांतील परंपरा व परस्परांशींसंबंध निश्चित करून त्यांचा संबंधदर्शक वंशवृक्ष (Stemma Codicum) तयार करतां येतो.

हस्तलिखितांच्या वंशवृक्षांचीं अुदाहरणें व त्यांचा अुपयोग पुढे दिलीं आहेत. लेखन तुलनेसंबंधी कांहीं सूचना डॉ. सुखटणकरांनी महाभारताच्या आदिपर्वाच्या चिकित्सित आवृत्तीच्या प्रस्तावनेंत दिल्या आहेत त्या मूळावरून वाचाव्या.

**विवेचक संहितीकरण** (Critical Recension)—मराठी ग्रंथनिर्मिति गेल्या १००० वर्षांतील असल्यामुळे पुष्कळ मराठी ग्रंथांचीं स्वलिखितें (autographs) किंवा प्राचीनतम प्रती (archetypes) अधिक कसून संशोधन केल्यास हातीं येअूं शकतील. मराठीची व्याप्ति व अर्वाचीनता लक्षांत घेतां प्रस्तुत लेखाच्या प्रारंभीं वर्णन केलेल्या पाठभेदापेक्षा अधिक गुंतागुंतीचे विवेचक संहिता ठरवण्याचे प्रश्न निर्माण होअूं नयेत अशी अपेक्षा आहे. तथापि नामदेवाचे अभंग, ज्ञानेश्वरांचें अमृतानुभव किंवा मुकुंदराजांचें परमामृत यांच्या निरनिराळ्या परंपरांतील पोथ्या अुपलब्ध झाल्या अशी कल्पना करूं आणि त्यानंतर त्या ग्रंथांच्या मूळ संहिता ठरवतांना कोणते प्रश्न निर्माण होतील त्यांचा थोडक्यांत विचार करूं.

प्रथमतः वर सांगितलेल्याप्रमाणे अ या ग्रंथाच्या हस्तलिखितांची तुलना करून शब्द वा अुतार्‍यांचा अभाव, विशिष्ट पाठभेदांचें अस्तित्व इ. पुराव्यावरून वंशवृक्ष ठरवावयाचा आहे. अ या ग्रंथाची क, ख, ग, घ, च, छ, ज अशीं सात हस्तलिखितें अुपलब्ध आहेत असें गृहीत धरूं. तसेंच यांपैकी क प्रत इतर ६ पेक्षा निराळी आहे, ख आणि ग प्रतींचा अेक गट आहे. अुरलेलीं चार हस्तलिखितें जरी अेका गटांतील असलीं तरी त्यांचे आपापसांत घ–च आणि छ–ज असे पोटगट आहेत तर आपल्याला त्यांचा परस्परसंबंध पुढीलप्रमाणे वंशवृक्ष मांडून दाखवतां येअील.




यांतील 'क्ष' 'य' 'ह्' आणि 'ज्ञ' या लुप्त प्रती असाव्या असें अनुमान आहे.

इतक्या शुद्ध परंपरेचीं जर हस्तलिखितें असतील तर अ किंवा अ, ही मूळ संहिता कशी असेल हें ठरवणें पुष्कळच सोपें असतें. आपण प्रथम छ व ज प्रतींतील पाठभेद ताडून या प्रतींच्या लेखकांच्या हातून झालेल्या चुका दुरुस्त करून 'ज्ञ' संहिता ठरवल्यास छ व ज प्रतींपेक्षा 'शुद्ध' किंवा 'मूळ' संहिता आपल्यास अुपलब्ध होईल. त्याचप्रमाणें ख व ग वरून 'क्ष' आणि 'घ,' 'च' किंवा 'ह्' व 'ज्ञ' वरून 'य' प्रती तयार करतां येतील. आपण योग्य दक्षता घेतली असेल तर 'क्ष' व 'य' या प्रती ख, ग, घ, च, छ, ज या प्रतींपेक्षा अधिक

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मूळाप्रमाणे असतात. 'क्ष' 'य' आणि 'क' या प्रती पाठभेददर्शक (Variant bearers) समजतात. 'क्ष' व 'य' प्रतींत अैक्यमत असलेला भाग 'अ,' मधील समजण्यास हरकत नाही. मतभेद असल्यास कोठला तरी अेक पाठभेद खरा असून दुसरा लेखकाचा दृष्टिदोप वा हस्तदोप असेल. अशा प्रसंगीं संपादक आपल्या चिकित्सक बुद्धीला पटेल तो पाठ स्वीकारून बाकीचीं पाठान्तरें टीपांत देतो.

पण संहिताचिकित्सा नेहमी अितकी सोपी असत नाही. अुदाहरणार्थ पुढील वंशवृक्ष पाहा.




यांतील क, ख, ग, घ, च, छ, ज, झ आणि ट या अुपलब्ध प्रती आहेत 'य' 'र' 'ल' 'व' आणि 'श' या अनुमित प्रती आहेत.

संहिता–चिकित्सेचे प्रमुख दण्डक तीन आहेतः—

(१) सर्व प्रतींत आढळणारा पाठ मूळ प्रतींत असावा असें गृहीत धरतात. हा दण्डक अगदी सोपा असल्यामुळे कोणाचाहि याबद्दल मतभेद होणार नाही.

(२) प्रतींच्या संख्येपेक्षा परंपरांच्या (codices) संख्येचें महत्त्व अधिक असतें. क ते घ या चार प्रतींतील पाठापेक्षा च ते ट पर्यंतच्या पांच प्रतींतील पाठ केवळ प्रतींचें संख्याधिक्य म्हणून अधिक शुद्ध असे मानीत नाहीत.

(३) भिन्न परंपरेंतील पाठैक्य मूळ प्रतींतील समजण्यांत येतें; उदा० झ आणि ट प्रतींत पाठभेद असून झ आणि क चा पाठ अेक असल्यास तोच मूळपाठ समजण्यांत येतो.

हे मुख्य दण्डक लक्षांत घेतले असतां अ किंवा अ, ची संहिता पुढील प्रकारांनी निश्चित करतां येअील––

प्रथमतः झ व ट मधील अेकमत असलेले पाठ 'श' मधील समजतात. या दोन प्रतींत पाठभेद असून त्यांपैकी अेका प्रतीचे पाठ अितर परंपरांतील पाठांशीं जुळत असल्यास तो 'श' मधील समजण्यांत येतो आणि अशा तऱ्हेने शुद्ध केलेली संहिता झ आणि ट संहितांपेक्षा अधिक शुद्ध असते. मात्र झ आणि ट या संहितांत पाठभेद असून त्या दोन्ही पाठभेदांना अितर



अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

परंपरांतील संहितांतून आधार नसेल तर दोन्हींच्या लेखकांनी निरनिराळ्या कारणांसाठी निरनिराळ्या चुका केल्या असतील. अशा वेळीं 'श'मधील पाठ अनिश्चित समजावा.

तसेंच च, 'व' (म्हणजे पर्यायानें ज प्रत) आणि 'श' या प्रतींच्या आधारें 'र' संहिता ठरवतां येअील.

आता क, ख, ग, घ प्रतींतील कोणत्याहि दोन प्रतींतील पाठैक्य अितर परंपरांतील म्हणजे 'र' प्रतींतील पाठभेदाशीं जुळत असल्यास किंवा या चारी प्रतींत मतभेद नसल्यास तो मूळ 'य' प्रतींत पाठ आहे असें मानतात. पण यांपैकी केवळ अेकाच प्रतींत आढळणारा विशिष्ट पाठ संशयित मानण्यांत येतो.

य आणि र प्रतींतील पाठैक्य अ, किंवा अ च्या मूळ संहितेंत स्वीकारतात. दोन्हींत पाठभेद असल्यास लेखनपद्धति व अंतःप्रामाण्याच्या दृष्टीने स्वीकारार्ह पाठ ठरवून दुसरा पाठ पायटीपेंत पाठभेद म्हणून नमूद करण्यांत येतो. ज्या वेळीं निरनिराळ्या परंपरेची अेकेकच प्रत अुपलब्ध असते तेव्हा तिच्यांत परंपरागत दोष घुसले तरी त्या पाठभेदांना पायटीपांत नमूद करावें लागतें. प्रत्येक परंपरेच्या निदान दोन दोन पोथ्या असतील तर त्यांच्या साहाय्याने मूळ संहितेंतील रूपनिश्चिति करतां येतें.

पोथी जर भिन्न परंपरेंतील दोन किंवा अधिक हस्तलिखितांवरून तपासून शुद्ध केली गेली असेल तर आणखी गुंतागुंतीच्या भानगडी निर्माण होतात.

अुदाहरणार्थ वरील अुदाहरणांतील ग आणि ज प्रतींवरून अेक प नामक प्रत आहे अशी कल्पना करूं आणि आज जिची परंपरा लुप्त झाली आहे अशा 'ल' प्रतीवरून आणि झ प्रतीवरून फ नामक प्रत तयार केली तर अशा मिश्रपरंपरांच्या (misch—codices) वा मिश्रस्वरूपाच्या (conflated) हस्तलिखितांच्या बाबतींत वरील वंशवृक्षात्मक पद्धत निरुपयोगी ठरेल. कारण अेकापेक्षा किती अधिक हस्तलिखितें लेखकाने वापरलीं, त्यांतील पाठभेद किती व कोणत्या तत्त्वावर स्वीकारले, असें करणाराची बौद्धिक पात्रता वा विद्वत्ता किती होती असे अनेक प्रश्न निर्माण होअून मूळ पाठभेद ठरवण्याचे दृष्टीने त्या लिखिताची अुपयुक्तता विवाद्य ठरते. असल्या प्रतींचा फायदा अेवढाच की अेखाद्या नष्ट झालेल्या परंपरेंतील किंवा प्रतींतील पाठ त्याने स्वीकारले असल्यास त्या प्रतींत काय पाठ असावेत यांचा अंदाज आपणांस घेतां येतो. अशा परिस्थितींत अुपलब्ध व अनुपलब्ध पण अुपलब्ध प्रतींवरून निश्चित केलेल्या (reconstructed) प्रतींच्या संहितांवरून परंपरागत संहिता (transmitted text) ठरवतां येते असें महाभारताच्या सध्या चालू असलेल्या चिकित्सित आवृत्तीवरून दिसतें.

संस्कृत-प्राकृतच्या मानाने मराठीची अर्वाचीनता व संकुचित विस्तार लक्षांत घेतां विशेष गुंतागुंतीचे प्रश्न निर्माण होण्याचा संभव कमी असला तरी संस्कृत-प्राकृत ग्रंथ संपादन करतांना विवेचक संहितीकरणांत काय काय अडचणी येतात व आपण त्या कशा निवारण केल्या हें डॉ. सुखठणकर किंवा डॉ. वैद्य यांच्याप्रमाणे ज्यांनी ग्रंथ संपादन करण्यांत अनेक वर्षे घालविलीं आहेत अशा विद्वान संपादकांनी निवेदन केल्यास बरें होअील.

---

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# पहिला ज्ञात मराठी शिलालेख

(लेखक— प्रा. दत्तो वामन पोतदार)

मराठी भाषेच्या अुगमाच्या जिज्ञासूंस हें विदितच आहे की श्रवणबेलगोला येथील गोमतेश्वराच्या जगविख्यात पुतळ्याच्या पायाच्या बाजूस कोरलेला जो शिलालेख प्रसिद्ध आहे तोच आज आपणांस माहीत असलेल्या मराठी शिलालेखांतील आद्य शिलालेख होय. हा लेख म्हणजे अेक लहानसें वाक्य आहे. या लेखाचे अुल्लेख विद्वानांनी प्रसंगविशेषीं यद्यपि केले असले तरी या अति कुतूहलजनक शिलालेखासंबंधाची विशेष विस्तृत आणि निश्चित माहिती मराठींत कोठेच प्रसिद्ध झाल्याचें आढळलें नाही. म्हणून येथे त्याजविषयी माहिती देण्याचें योजिलें आहे.

या शिलालेखाची भाषा आणि काळ—आणि या शिलालेखाच्या बरोबरीचे त्याच अर्थाचे अितर भाषेंतील लेख शेजारींच आहेत—यांविषयी विद्वानांनी अनेक प्रकारची चर्चा आजवर केलेली आहे. तथापि मूळ शिलालेख पाहून आणि तत्संबंधी म्हैसूर सरकारानें प्रसिद्ध केलेले ग्रंथ वाचून मला सुचलेल्या कित्येक मुद्यांचें विवरण मी पुढे करणार आहें. या विवरणांत अर्थातच या पुतळ्याबद्दलहि थोडें लिहावें लागेल. तथापि या लेखाचा भर मुख्यतः पुतळ्यावरील मराठी शिलालेखांचा परिचय करून देण्याचा आहे.

गोमतेश्वराचा हा पुतळा श्रवणबेलगोला या गांवानजीकच्या टेकडीवर अुभा केलेला आहे. ही टेकडी बहुधा शिलारसाच्या अुद्रेकाने बनलेली असून पालथ्या घमेल्याच्या आकाराची आहे. असेंहि म्हटलें तरी चालेल की ती अेखाद्या अेकसंधी घमेल्याप्रमाणे अगदी साफ आणि अेकसंधी आहे. टेकडीच्या बऱ्याच अुंचीच्या भागावरून घसरत घसरत सहज तळाशीं येतां येतें. झाडझुडूप किंवा अुंच गवत वगैरे कांहीहि या टेकडीच्या घमेल्याच्या मध्यभागावर अुगवलेलें दिसत नाही; किंबहुना तसें तें अुगवण्यास तेथे विशेषसा अवकाशच नाही. या टेकडीच्या माथ्यावर गोमतेश्वराचा प्रचंड दगडी पुतळा अुभा असून शान्त मुखाने सर्वांचें अहोरात्र स्वागत करीत आहे. हा पुतळा अखंड बिनजोडाचा आणि दगडी आहे. कदाचित् टेकडीचें अेखादें अंचाड तासून किंवा बहुशः तेथेच पडलेल्या अेखाद्या लघुपर्वतप्राय शिलाखंडाचा अुपयोग करून हा पुतळा घडविण्यांत आला असावा. हा शिलाखंड केवढा प्रचंड असेल याची कल्पना पुतळ्याच्या मापावरून सहज करतां येअील. पुतळ्याची अुंची ५७ फूट आहे व त्याच्या दोन खांद्यांमधील रुंदी २६ फूट आहे. साहजिकच पायाची लांबी ९ फूट आहे आणि बोटांची लांबी ३, ४, ५ फूट अशी निरनिराळ्या प्रकारची आहे. पुतळ्याची घडण सुंदर आणि पाहणाऱ्याचें मन प्रसन्न करणारी आहे. अशा हा प्रचंड पुतळा दोड्डबेट्ट किंवा अिंद्रागिरी नांवाच्या टेकडीवर अुभा आहे. ही टेकडी ४७० फूट अुंचीची असून समुद्रसपाटीपासून तिची अुंची ३३४७ फूट आहे. पुतळा स्वतंत्रपणें अुभा असून त्यावर शिखर वगैरे कांही नाही आणि त्याच जागीं सुमारे हजार वर्षें तो अुभा आहे तरी तो अगदी नुकताच घडविल्यासारखा दिसतो. अेवढा अुंच पुतळा अुभ्या हिंदुस्थानांत दुसरा कोठेहि नाही. अफगाणिस्थानांत बामियान येथे अेक बुद्धाचा पुतळा याहूनहि अुंच आहे. गोमट पुतळ्याचा तळ कमला-

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कृति बनविला आहे. या पुतळ्याच्या डाव्या पायाला लागून नागरी लिपींत दोन स्वतंत्र ओळी खोदलेल्या आहेत. पुतळ्याच्या दोन्ही पायांच्या बाजूंस शिल्पकाराने दगडी वारूळें घडविलेलीं आहेत. डावीकडील वारुळाची उजवी बाजू आणि पुतळ्याचा डावा पाय यांच्यामध्ये पुतळ्याच्या आकारमानास अनुसरून साहजिकच मोठा कोनाड्यासारखा अवकाश निर्माण झालेला आहे. नागरी लेख हा कोनाडा आणि पुतळ्याचा पाय यांनी सांधलेल्या कोपऱ्यापासून सुरू झालेले आहेत आणि त्यांची समाप्ति वारुळाच्या उजव्या बाजूवर झालेली आहे.

प्रस्तुत पुतळा दिगंबर जैनपंथीयांच्या ताब्यांत आहे आणि श्रवणबेलगोला गांवांत भांडारबस्ती म्हणून जो प्राचीन जैन मठ आहे त्या मठांतून गमितेश्वराच्या अर्चेची वगैरे व्यवस्था चालते. जैनेतरांना पुतळ्यास हात लावूं देत नाहीत; किंबहुना पुतळ्याच्या बैटकीच्या दगडी कमळावरहि जाऊं देत नाहीत. यामुळे पुतळ्याच्या भोवताली असलेल्या लेखांचें वाचन बऱ्याच दूर अंतरावरून करावें लागतें ही मोठी अडचण आहे. पुतळ्याची आणि त्यावरील लेखांचीं मोजमापें घेणें हें संशोधकास यामुळे अवघड झालें आहे. या पुतळ्याचा सर्वोत्कृष्ट फोटो म्हैसूरचे अप्पुस्वु पिलाओी यांनी सुमारे ५०–५५ वर्षांपूर्वी (ख्रि.स.१८८७) घेतलेला आहे. परंतु तो कोठे प्रसिद्ध झाल्याचें आढळत नाही. हा फोटो घेण्यासाठी जैन अधिकारी मंडळाने मस्तकाभिषेकप्रसंगीं विशेष प्रकारच्या सवलती दिल्या होत्या. या फोटोचे सर्व अधिकार अप्पुस्वुस्वामी यांनी आपल्या स्वाधीन ठेवल्याचें राअीस यांच्या ग्रंथावरून दिसतें. राअीस यांचा बेलगोलाशिलालेखाविषयीचा ग्रंथ १८८९ मध्ये प्रसिद्ध झाला. त्यांत दिलेला गोमतेश्वराचा फोटो आणि आर. नरसिंहाचार यांनी १९२३ मध्ये राअीस यांच्या ग्रंथाची जी सुधारलेली आवृत्ति काढली त्यांत दिलेला फोटो यांची तुलना करतां राअीस यांच्या ग्रंथांतील फोटो निदान पुतळ्यावरील नागरी शिलालेखांपुरता तरी अधिक स्पष्ट अतअेव अुपयुक्त वाटतो. याशिवाय म्हैसूरच्या शंकर आणि कंपनी या खासगी कंपनीने काढलेला गोमट-फोटोहि अुपलब्ध आहे. या तिहींपैकी कोणत्याहि अेका फोटोंत दोन्ही नागरी शिलालेख संपूर्णपणें अुठलेले दिसत नाहीत. शेवट-शेवटचीं कांही अक्षरें तेवढीं या फोटोंत अुठलेलीं दिसतात. राअीस ग्रंथांतील प्रतिमेंत तीं अधिक स्पष्ट आलेलीं आहेत. गोमतेश्वराचा पाय आणि जवळील वारुळ यांच्यामधील कोनाड्यावर किरण साधून जर या नागरी लेखांचा अेखादा अुत्कृष्ट असा फोटो पुढे मागे अुपलब्ध होईल तर मराठी वाचकांची आणि मराठीच्या अभ्यासकांची पूर्ण तृप्ति होईल.

गोमट-पुतळ्यावरील नागरी शिलालेखांचे तीन छाप अधिकृत ग्रंथांत प्रसिद्ध झालेले आढळले. हे तीन छाप म्हटले म्हणजे अनुक्रमें (i) राअीस् (१८८९), (ii) हुल्ट्झ् (१९०२) आणि (iii) नरसिंहाचार (१९२३) यांनी दिलेले होत. पैकीं राअीस् आणि नरसिंहाचार यांचे स्वतंत्र ग्रंथच श्रवणबेलगोला लेखांसंबंधी प्रसिद्ध झालेले आहेत; आणि हुल्ट्झ् यांनी अेपिग्राफिआ अिंडिका– खंड ७, भाग ३, लेख क्र. १४, जुलै १९०२, पृष्ठें १०८–१०९ वर कारकळ वेणूर व बेलगोला येथील तीन जैन गोमट मूर्तींविषयी लेख लिहिला आहे. या लेखांत डॉ. हुल्ट्झ् यांनी श्र. बे. गोमटावरील नागरी व द्राविडी लेखांचे ठसे देऊन लेखांविषयीं आपले अभिप्राय गोविले आहेत. अिष्ट नागरी लेखांचे तीनहि स्थळींचे हे ठसे सूक्ष्मपणें तपासून पाहतां निश्चित निर्णय झाला की राअीस्-ग्रंथांतील ठसे अगदी मूळाबरहुकूम सर्वप्रकारें तंतोतंत बरोबर नाहीत. लेख किंवा कचे ठसे समोर ठेवून कामगारलेखकाकरवीं नीट सरळ अक्षरें काढवून तयार केले आहेत. त्यामुळे अक्षरांचीं वळणें थोडीं सुधारलीं गेलीं आणि मुळांत ओळी जरा वक्र आहेत त्या साफ सरळ झाल्या नरसिंहाचार यांच्या ग्रंथांत ठसा बरहुकूमपणांत राअीस ठशांहून


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

श्रेष्ठ असला तरी ठसाकाराची कारवाअी व सफाअी त्यांतहि शिरली आहे हें स्पष्ट दिसतें. तिसरे जे डॉ हुल्ट्ज् यांचे ठसे मात्र अगदी लेखाबरहुकूम तंतोतंत, फक्त लघुमान योजून, तयार केलेले आहेत. हुल्ट्झ् यांनी योजलेलें लघुमान ·०६६ म्हणजे सुमारें १/१५ आहे. अर्थात् मूळ नागरी लेख हुल्ट्झ् प्रतिभेच्या सुमारें १०००/६६ किंवा १५ पट आकाराचा ठरतो मूळ लेखांतच पहिली श्री जेवढी मोटी व अुंच आहे त्यापेक्षा पुढील अक्षरें आकारमानांत अुतरत गेलेलीं आहेत. लेखासोबत दिलेला ठसा हा हुल्ट्झ् ठशाची हुबेहूब त्याच आकारमानाची प्रतिमा आहे. माप घेअून गणित केलें तर कळून येअील की पुतळ्यावर कोरलेली चामुंडराय लेखांतील **मूळ 'श्री' अुंचींत सुमारें दीड फूट** भरेल ! ! केवढी प्रचंड 'श्री' ही ! अेवढ्या प्रचंड अुंचीची अक्षरवटिका असलेला हा मराठी शिलालेख पुष्कळ दूर अंतरावरूनहि सहज वाचतां येतो यांत नवल नाही. अेकंदर लेखाची अुंची पुतळ्याच्या अुंचीला शोभेल अशीच आहे. हें शिल्पच तसें भव्य आणि प्रचंड आहे.

नागरी शिलालेखांच्या दोन ओळी आहेत, आणि प्रत्येक ओळींत अेकेक निराळें संपूर्ण वाक्य खोदलेलें आहे. या दोनी ओळी अेकाखाली अेक आहेत. पहिली ओळ चामुंडराजाबद्दलची असून दुसरी गंगराजाबद्दलची आहे. दीड फुटाच्या मापाची श्रीचामुंडराजाच्या लेखांत आहे. गंगराजाच्या लेखाची श्री पहिल्या श्रीच्या सुमारे निम्याने अुंच आहे, आणि त्यांतील पुढील अक्षरेंहि क्रमाने बारीक होत गेलीं आहेत. आम्हीं नुकतेंच गोमतेश्वराच्या सान्निध्यांत या दोन्ही नागरी ओळींचें शांतपणें व कौतुकाने बराच वेळ निरीक्षण केलें. वर वर पाहणाऱ्याला दोन्ही ओळींतील अक्षरवटिका सारख्याच वाटतील अितकें साम्य त्यांत आहे. याच साम्यामुळे डॉ. हूल्टझ् हे चकले आहेत आणि म्हणतात:—"As the type of 11.1 and 2 (हूल्टझ् नं. 52b = राअिस् नं. 75 = नरसिंहाचार नं. १७९।१८० = नागरी गोमट लेख) is quite identical it may be assumed that both lines were engraved in the time of Gangaraj × × ×". परंतु बारकाअीने निरिक्षण करतांना सहज दिसणाऱ्या साम्याबरोबर सहज न दिसणारे असे कांही भेदहि आमच्या लक्षांत आले. दोनही श्री वळणांत अगदी सारख्या नाहीत हें या दोन्ही ओळींचें छायाचित्र या अंकासोबत जोडलें आहे तें पाहून कोणासहि खात्री करून घेतां येअील. चामुंडराजाच्या ओळींत 'जें' आणि 'लें' यांवर अनुस्वार खोदलेले आहेत परंतु गंगराज लेखांतील या दोन्ही अक्षरांवर अनुस्वार नाहीत, हाहि दुसरा फरक लहानसा असला तरी महत्त्वाचा आहे. गंगराजाच्या लेखांत ग वर अनुस्वार आहे पण चामुंडराय लेखांतील दोन्ही अनुस्वार भरीव असून गंगराजांतील अनुस्वार पोकळ आहेत हा तिसरा फरक. अेवढे फरकच लक्षांत घेतले तरी कालदृष्ट्या दोन्ही लेख अेकाच वेळचे नसून ते कांही वर्षांच्या अंतराने खोदलेले आहेत असा पक्ष मनांत दृढ होतो. आणि डॉ. हूल्टझ् यांचा अभिप्राय अग्राह्य ठरून राइस यांचें मत ग्राह्य होतें.

पहिल्या लेखांत 'श्री चामुंडराजें करवियलें' या वाक्यांत काय 'करवियलें' तें सांगितलेलें नाही. परंतु गंगराजाच्या लेखांत सुत्तालें म्हणजे कोटी—कठडा—करवियलें बांधला असा कर्मनिर्देश आहे. चामुंडरायाच्या वेळीं त्याने भद्रबाहूचा अथवा बाहुबळीचा म्हणजे गोमतेश्वराचा प्रचंड पुतळा तेवढाच अुभा केला; त्याच्या भोवताली तट वगैरे कांही अुभे केलें नाही तीं कामें मागून दुसऱ्या लोकांनी केलीं. अेक तर पुतळा अतिशय भव्य आणि प्रचंड होता, आणि दुसरें भोवताली अन्य कांही काम केलें नव्हतें; त्यामुळे चामुंडराजाला काय करवियलें तो कर्मनिर्देश न केला तरी चालण्यासारखें होतें. अुभा असलेला पुतळा तेंच त्याचें भव्य कर्म त्याने करवियलें हें

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कर्मनिर्देश न करतांहि सांगण्यासारखें आणि समजण्यासारखें होतें; म्हणून लेखांत तसा शब्द खोदवला गेला नाही. तसेंच लेखांच्या अक्षरांची उंची. तीहि पुतळ्याच्या उंचीला शोभेल अशी घ्यावयाची असल्याने आणि याच मजकुराचें कथन द्राविडी भाषांतहि खोदावयाचें असल्यामुळे जागेच्या दृष्टीने विचार करूनहि कर्मनिर्देश टाळून जागा वांचवावी आणि वांचविलेल्या जागेचा उपयोग लेखांतील अक्षरें शक्य तेवढ्या उंचीचीं करून लेख पुष्कळ लांबूनहि स्पष्टपणें वाचतां येईल असा बेत योजून चामुंडराजाचा लेख तयार झाला असला पाहिजे. मागाहून गंगराजाने जेव्हा सुत्तालें केलें आणि आपणहि लेख कोरण्याचें ठरविलें त्या वेळीं पूर्वीच्या लेखाने व्यापलेली जागा लक्षांत घेऊन जागेच्या त्याच मापांत मूळ लेखाच्या खाली थोडें अंतर टाकून गंगराजाचा लेख कोरविण्यांत आला. परंतु वर दुसरा लेख होता तेव्हा घोटाळा टाळण्याकरिता आपल्या कामाचें विशेष कथन गंगराजाने केलें आणि म्हणून त्याच्या लेखाची अक्षरवटिका, तेवढ्याच जागेंत अधिक अक्षरें बसविणें प्राप्त झाल्यामुळे, साहजिकच मापाने लहान घरावी लागली. सहजासहजीं घडून गेलेल्या या घटनेचा वरील स्वाभाविक उलगडा ध्यानांत घेतला म्हणजे चामुंडराजाचा लेख आधींचा, केवळ पुतळा उभा केल्याचा, अतएव गंगराज लेखाहून जुना आणि पुतळा उभारण्याच्या वेळचाच असें स्पष्ट अनुमान करतां येतें. खुद्द दोन्ही नागरी लेखांत आणि पुढील द्राविडी लेखांत कालनिर्देश केलेला नाही यामुळे इतर प्रमाणांच्या साहाय्यानेच हे लेख एका वेळचे कीं निरनिराळ्या वेळचे या मुद्याचा विचार करणें प्राप्त होतें. गंगराज आणि चामुंडराज यांच्या काळाविषयी आपणांस कांही अन्य प्रमाणें उपलब्ध नसतीं तरी वस्तुस्थितीचा वर उलगडा केला आहे त्याप्रमाणे सरळ अनुमान चालवून चामुंडराय लेख आधींचा आणि गंगराजलेख नंतरचा असें आपणांस स्थापित करतां आलें असतें.

आता या पुतळ्याच्या उभारणीच्या काळाविषयी विचार करूं. कर्नाटकांतील सुविख्यात गंगराज्यांतील राजा राजमल्ल-राचमल्ल-सत्यवाक्य याचा प्रधान चामुंडराय याने हा पुतळा उभा केला. जगदेकवीर गंगचूडामणी राचमल्ल याची कारकीर्द शके ८९६ (इ. स. ९७४) ते शके ९०६ पर्यंतची होती असें शासनप्रमाणांवरून स्थापित झालें आहे. यावरून या दहा वर्षांत जेव्हा चामुंडराय राचमल्लाचा प्रधान होता तेव्हा त्याने गोमटेश्वराचा पुतळा उभा केला असला पाहिजे. गोमताच्या उभारणीविषयी जैनपरंपरेचा जो श्लोक उपलब्ध आहे त्यांत 'कल्यब्दे शच्छताख्ये' म्हणजे शक ६०० मध्ये हा पुतळा झाल्याचें म्हटलें आहे व या श्लोकांत ज्या अर्थी 'श्रीमच्चामुंडराजे बिलुगुलनगरे गोमटेशप्रतिष्ठाम्' असें म्हणून चामुंडराजाने हा पुतळा स्थापला आहे असें म्हटलें आहे, आणि ज्या अर्थी चामुंडराजाचा काल अनेक प्रमाणांनी वर निश्चित केल्याप्रमाणे ठरत आहे त्या अर्थी परंपरेच्या वरील श्लोकांत कांही तरी चूक झाली आहे असें मानणें भाग आहे. या श्लोकांत विभवसंवत्सरांत चैत्र शु ५ अशी स्थापनेची मितीहि दिली आहे आणि नक्षत्र आणि योग यांचा तपशीलहि दिला आहे. परंतु श्लोकांत दिलेला शक ६०० चा असल्यास त्याला 'विभव' येत नाही, सबब यांत कांही चूक आहे याविषयी राईस याचें लिहिणें मान्य करावें लागतें. चामुंडराजाने पुतळा उभारल्याची कथा कन्नड वाङ्मयांतहि अनेक ठिकाणीं आलेली आहे. स्वतः चामुंडराय हा कविशेखर पदवी उपभोगणारा असून शक ९०० मध्ये त्याने आपला चामुंडरायपुराण हा ग्रंथ लिहिल्याचें सर्वमान्य आहे. या ग्रंथांत चामुंडरायाने आपली माहिती दिली आहे. त्याने मिळविलेल्या निरनिराळ्या विजयांवरून व त्याच्या सत्यप्रीतिवरून, समरधुरंधर, वीरमार्तंड किंवा सत्ययुधिष्ठिर-इत्यादि पदव्या त्याला मिळाल्या होत्या असें दिसून येतें. आपल्या वरील ग्रंथांत चामुंडरायाने


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आपली हकिकत देतांना ज्या अनेक गोष्टींचा अुल्लेख केला आहे त्यांत गोमतेश्वराचा पुतळा आपण स्थापन केला याबद्दल तो कोठेहि अुल्लेख करीत नाही. परंतु तो त्याने स्थापन केला हें निश्चित आहे. यावरून असें मानणें भाग पडतें की चामुंडरायपुराण शक ९०० त रचून झाल्यानंतर आणि शके ९०६ त राचमल्ल याने सल्लेखनाविधीने जैनधर्मानुसार प्राणार्पण करण्यापूर्वी, चामुंडराय राचमल्लाची प्रधानगिरी करीत असतांना, हा पुतळा त्याने केव्हा तरी अुभारला. याचा अर्थ पुतळ्याच्या स्थापनेचा काळ शक ९०० नंतरचा व ९०६ पूर्वीचा समजला पाहिजे.

पुतळास्थापनेचा निश्चित शक किंवा वर्ष आपणांस याप्रमाणे अनुमानानेच ठरवावें लागत आहे. राअीस याने शक ९०५ म्हणजे इ. स. ९८३ हें वर्ष पुतळा तयार झाल्याचें मानावें असें सुचविलें आहे आणि त्याप्रमाणे सर्व विद्वान मानतात. सबब स्थूल मानाने शक ९०५ किंवा इ. स. ९८३ हें पुतळ्याच्या स्थापनेचें वर्ष ग्राह्य धरण्यास हरकत नाही. मागे दाखविल्याप्रमाणे पुतळ्याची स्थापना झाली त्याच वेळीं 'श्रीचामुंडराजें करवियलें' हें वाक्य खोदून आलें असलें पाहिजे. अर्थात् शक ९०५ अथवा इ. स. ९८३ हें वर्ष स्थूल मानाने पुतळ्यावरील दोन नागरीलेखांपैकी पहिल्या म्हणजे चामुंडरायाच्या लेखाचें वर्ष असें अनुमानाने धरण्यांत देतें तें ग्राह्य समजण्यास हरकत नाही. मात्र यावरून या नागरी लेखाचा काळ देतांना शक ९०५ च्या मागे 'सुमारास' किंवा त्या अर्थाचा शब्द घालण्यास विसरतां कामा नये. या गोष्टीकडे दुर्लक्ष केल्यामुळे महाराष्ट्रीय ज्ञानकोशांत आणि कै. भावे यांच्या महाराष्ट्र सारस्वत पुस्तकांतील तिसऱ्या आवृत्तीच्या ११ व्या पानावरील टीपेंत केलेला 'च'कारयुक्त अुल्लेख निर्दोष समजतां येणार नाहीत. दुसरा नागरी लेख जो गंगराजाचा त्याचेंहि वर्ष अगदी निश्चित नाही, पण स्थूल मानाने तें इ. स. १११७ (शके १०३९) असें श्री आर. नरसिंहाचार वगैरे विद्वानांनी ग्राह्य केलें आहे आणि तेंच आपण ग्राह्य धरण्यास चिंता नाही. आणि हेंहि वर्ष 'सुमाराचें' आहे. अेवढें मात्र निश्चित आहे की प्रख्यात होयसळ राजा विष्णुवर्धन याचा प्रधान गंगराज याने गोमतेश्वर पुतळ्याभोवती कोटी-कठडा घातला आणि त्याचाच अुल्लेख त्याच्याच नांवाच्या चामुंडराय शिलालेखाच्या खालील शिलालेखांत आहे. चामुंडराजानंतर गंगराज हाच जैन धर्माचा मोठा प्रवर्तक झाला अशी परंपरा आहे. हिशेब करून पाहिला असतां चामुंडराय आणि गंगराय यांजमध्यें सुमारे १५० वर्षांचें अंतर येतें. तथापि मागे दाखविल्याप्रमाणे पुतळ्यावरील चामुंडरायाचा लेख आधीचा आणि गंगराजाचा अर्थात् त्याच्या वेळचा असें राअीस आणि आर. नरसिंहाचार प्रभृति विद्वानांनी मान्य केलें आहे.

सदरील दोन लेख नागरी लिपींत आहेत याविषयी कांही वाद नाही. मात्र या लेखांच्या भाषेविषयी राअीस स्वतः संशयात्मक मत देतो. त्याच्या मतें सदरील लेखांची भाषा अर्धमागधी अथवा जैन महाराष्ट्री समजावी (Rice, Inscriptions of Sravana Belgola, IX, p. 23.). तो पुढे अेके जागीं (X, p. 62, 151) टीपेंत या लेखांची भाषा कोणती हें स्पष्टपणें कळत नाही. कदाचित् ती प्राकृत अर्धमागधी असेल अथवा बहुशः गुजराथी असेल असेंहि सुचवितो. परंतु राअीसच्या मागाहून बेळगोळा शिलालेखांचें संपादन करणारे 'प्राकृत विमर्शविचक्षण' रा.ब. आर. नरसिंहाचार, म्हैसूर सरकारचे प्राच्यशोधसंचालक, आणि डॉ. व्हूल्ह्स् यांनी हे लेख मराठींत असल्याचें निःशंकपणें लिहिलें आहे. राअीसच्या मताची चिकित्सा नरसिंहाचार आपल्या या श्रवणबेळगोळावरील अिंग्रजी ग्रंथांत केलेली आढळत नाही. आजच्या मराठी वाचकाला हे लेख स्पष्टपणें मराठी मानण्यास कसलीच अडचण वाटणार नाही. हे लेख

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मराठींत आहेत असें म्हटलें म्हणजे आजच्या ज्ञात शिलालेखांत वरील चामुंडराज लेख हाच आद्य ज्ञात मराठी शिलालेख ठरतो.

मराठी शिलालेखांत जो मजकूर आहे अगदी त्याच अर्थाचा मजकूर पुतळ्याच्या पायावर असलेल्या दुसऱ्या अन्य भाषेंत असलेल्या शिलालेखांत आहे. द्राविड शिलालेखांत पहिली ओळ पूर्वद हळेकन्नडमध्ये आहे (Rice). या पहिल्या ओळींत 'श्रीचामुंडराजम् माडिसिदम्' असा कन्नड मजकूर आहे. आणि त्याच्याखाली तामीळ भाषेंत 'श्रीचामुंडराजम् सेयव्वित्तन्' (म्हणजे चामुंडरायाने करवियलें) असा मजकूर अर्धा ग्रंथलिपींत आणि अर्धा वट्टेलुट्टु लिपींत खोदलेला आहे. याच्या खाली तिसरी ओळ हळेकन्नडमध्ये असून मजकूर येणेंप्रमाणेः— 'श्रीगंगराज सुत्तालयवम् माडिसिद'. याशिवायहि हुल्ल वगैरेंचे लेख वारुळावर आहेत पण ते सर्व पुढील काळचे आहेत.

असो. येणेंप्रमाणे आज आपणांस ज्ञात असलेल्या सर्वाद्य मराठी शिलालेखाचा परिचय अिकडील वाचकांस करून दिला आहे. स्वतः पुष्कळ दिवस या लेखकाला हा लेख समक्ष पाहण्याची व त्याचा परिचय करून घेण्याची इच्छा होती ती नुकतीच म्हैसूरच्या सफरींत परिपूर्ण झाली. श्रवणबेलगोला येथे जाण्यासाठी चेनरायपटणावरून जावें लागतें. म्हैसूरहून बेलगोला सुमारे ६० मैलांच्या अंतरावर आहे. म्हैसूर संस्थानाच्या हासन जिल्ह्यांत हें ठिकाण असून आर्सिकेरी किंवा बाणावर स्टेशनापासून चेनरायपटणास येअून मोटारने बेलगोल्यास जातां येतें. सरकारी मुशाफरखान्यांत राहण्याची बेलगोल्यास अुत्तम सोय आहे. गोमटदर्शनाने फार दिवसांची मनीषा तृप्त झाली आणि सबंध शिलालेखाचा यथास्थित परिचय करून घेतां आला. हा आपल्या भाषेंतील आद्य ज्ञात शिलालेख आणि गोमतेश्वराचा सर्व भरतखंडास ललामभूत असलेला पुतळा सर्वांनी अवश्य पाहावा अशी अिच्छा व्यक्त करून हा परिचयात्मक लेख पुरा करतों.

---

## स्त्रियांच्या म्हणी

[ ६२ व्या अंकावरून पुढे ]

(६०९) शेजारणीचा भात अन् आअीचा हात.
(६१०) आठवड्याचा माळी अन् महिन्याने करी पाळी.
(६११) माझी दुखती कंबर, मला म्हणती खा अुंबर.
(६१२) तण गेलँ पण गेलँ, म्हातारपणीं न्हाण आलँ.
(६१३) फाटक्या चोळिला तुटक्या बाह्या, आयतीच आली वरमाया न्हाया.
(६१४) नवी निभाली नांदाया, चिटकी नाही रांधाया. [चिटकी—लहान गाडगें]
(६१५) पोटांत निघती कळ, मला म्हणती बारीक दळ.
(६१६) जेथे नाही वग, तेथे डोळे अुघडून बघ.
(६१७) चलती तेथे भरती.



श्रावणबेळगोळा येथील श्रीगोतमेश्वर मूर्ति

[सुमारे अेक हजार वर्षांपूर्वी श्रवणबेळगोळा येथील अिंद्रगिरीवर चामुंडरायाने अुभी केलेली गोमतेश्वराची ५७ फूट अुंचीची प्रचंड आणि अद्वितीय दगडी मूर्ति.]





श्रवणबेळगोळा गोमतेश्वर मूर्तीच्या डाव्या पायाच्या बाजूस खोदलेले दोन नागरी मराठी शिलालेख

[राअिस् यांच्या ग्रंथांतील गोमट-प्रतिमेवर अुमटलेले वरील लेख जसेच्यातसेच पण यंत्रसाहाय्याने मोठे करून तयार केलेली लेख-प्रतिमा.]



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

सुमारे एक हजार वर्षांपूर्वीचे मराठी शिलालेख.



श्रीचावुण्डराजें करवियलें
श्रीगंगराजे सुत्ताले करवियले

डॉ. इ. हुल्ट्झ यांच्या फोटोझिंको ठशावरून— स्केल (माप) ·०६६ (जुलै १९०२)
अेपिग्राफिआ अिंडिका—व्हॉ. ७, माग ३, पृ. १०८–१०९

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## परीक्षणें

### धर्म-तत्त्वज्ञान

**हिंदुधर्माची समीक्षा**— ले० वे. शा. सं. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी; प्रका० नागपूर विद्यापीठ, नागपूर.

'पत्रिके'चे संपादक रा. काळे यांनी 'हिंदु धर्माची समीक्षा' या पुस्तकाचें परीक्षण करण्यास जेव्हा मला सांगितलें तेव्हा मोठ्या आशाळभूतपणाने मीं त्यांच्या म्हणण्यास रुकार दिला. मनांतला हेतु असा : नव्याजुन्या विद्यांत प्रवीण असलेल्या लक्ष्मणशास्त्री जोश्यांनी लिहिलेलें पुस्तक वाचून नवीन असें कांहीं माझ्या हातीं लागेल; परंतु ती माझी आशा फोल झाली असें मोठ्या कष्टाने म्हणावें लागतें. अेवढेंच नव्हे तर पुस्तक वाचतांना वारंवार मन उद्विग्न होण्याचे प्रसंग येत त्या वेळेस संयमन करणें थोडेंसें जड जाअी असें म्हणावयास हरकत नाही.

हिंदुधर्माचें समीक्षण करीत असतां वस्तुतः शास्त्रीबोवांनी आपल्या या विद्यापीठाच्या व्याख्यानांत नास्तिकवादाची स्थापना करण्याचा प्रयत्न केला आहे. ह्या विद्वान शास्त्रीबोवांना कोणताच धर्म मान्य होण्यासारखा नाही हें खालील अुताऱ्यांवरून दिसून येईल.

"धर्माने युगानुयुगें सर्वज्ञतेचा मक्ता स्वतःकडे घेतला आहे; सचेतन व अचेतन विश्वावर आपलें वर्चस्व आहे अशी बतावणी आजपर्यंत धर्मच करीत आला आहे. विश्वाचें गूढ सहज लीलेने अुकलून दाखवितों असा गर्व धर्मानेच आजपर्यंत वाहिला आहे. अज्ञाताबद्दल धर्माला **आदर नाही**; धर्माने लोकांवर नेहमी **वजन कसें मारावें** अेवढ्याचीच फार काळजी घेतली आहे. सत्याची त्याला फारशी कदर नव्हती. अुपनिषदांतील व दर्शनांतील कांहीं विचार वगळल्यास लोकांवर वजन ठेवण्यापुरताच कुतः, कथं अित्यादि प्रश्नांचा धर्माने विचार केला आहे" (पृष्ठ २३०). "धर्म हा भ्रांतिरोग आहे" (पृष्ठ १२७). "निःश्रेयस् ही अेक मुरळ आहे" (पृष्ठ १४५). [जाड ठसा आमचा]

अेवढ्यावरून शास्त्रीबोवांच्या धर्मविषयक मतांची कल्पना करितां येअील. त्यांना कोणताच धर्म नको आहे. मग हिंदु धर्माचा त्यांनी धिक्कार केल्यास त्यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाही.

कोणताच धर्म नको म्हणतां म्हणतां व बुद्धिवादाची तरफदारी करीत असतां हेच लोक हिंदुस्थानांत अेका नवीन धर्माची स्थापना करीत आहेत. त्या धर्माचा संस्थापक कार्ल मार्क्स असून कॅपिटल् (भांडवल) हा या धर्माचा धर्मग्रंथ होय. जगांतील प्रत्येक घटनेला आर्थिक कारण आहे हा या धर्माचा डॉगमा समजला जातो. त्यामुळे कंसाला ज्याप्रमाणे जलीं, काष्ठीं येथून तेथून सर्वत्र कृष्ण दिसत होता त्याप्रमाणे या मार्क्सधर्मीयांना व्याज, जुलूम, मांडवलशाही यांवांचून कांहींच कोठे आढळत नाही. "मागासलेली अुत्पादनपद्धति हा धर्मसंस्थेचा आधार होय" (पृष्ठ १८) आणि "हा धर्म टिकून राहण्याचें मुख्य कारण म्हणजे समाजांतील वर्गविग्रह व अंतःकलह हें होय" (पृष्ठ ७३). "धर्माचीं सूत्रें नेहमी सत्ताधिकाऱ्यांच्या हातीं असल्यामुळे वैषम्यमूलक समाजरचना व कायदा यांना पवित्र व शाश्वतमूल्य देण्याचें काम करणें धर्माला भाग पडलें" (७३ व ९५) "अर्थात् अशा धर्मव्यवस्थेत अुत्पादक वर्गावर चरणारा फुकटखाअू वर्ग निर्माण होतो (१९७)".

म. सा. प. (१५-३-७)

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

"जुलमी कायद्यांच्या द्वारें वैदिक आर्यच व्यवसायजन्य फलांचा अपहार करीत असत. वैदिक आर्य व्याज (interest), नफा (profit) आणि खंड (rent) शूद्रांच्या कडून किंवा कनिष्ठ वर्गांकडून अुच्च वर्णांपेक्षा फार मारी प्रमाणांत वसूल करीत असत. कृषि, शिल्प व अुच्चवर्णसेवा हे तीन व्यवसाय शूद्राला नेमून दिले. पण त्यांत शूद्रांना भयंकर हाल सोसावे लागत. कारण व्यवसायाचें फल त्यांच्या पदरांत फार कमी पडत असे" (१८६).

शास्त्रीबोवांच्या कनवाळू अंतःकरणाला बैलांची आठवण कां होअूं नये हें समजत नाही. कारण मनुष्याच्या जीवनाला अवश्य असें जें अन्न त्याची पैदास वृषभादि पशूंकडून होत असते. शास्त्रीबोवांचें आशावादित्व लोभनीय आहे यांत शंका नाही. कारण त्यांचा असा दृढ विश्वास आहे की "आर्थिक साधनें लोककल्याणाकरिता वापरलीं म्हणजे धर्माचें अुच्चाटण झालेंच म्हणून समजावें" (७४) आणि म्हणून त्यांना पाहिजे तशी क्रांतिपूर्वक समाजरचना झाली म्हणजे "धार्मिक मनःस्थितिच नष्ट होते" (७४-७५).

अशा विचारसरणीच्या माणसांनी सामाजिक अुच्च ध्येयाची साधना म्हणजेच अध्यात्मवाद होय (२२७) असें मानणें स्वाभाविक आहे. वेदशास्त्रसंपन्न भाअी लक्ष्मणशास्त्री यांना मार्क्सची अैतिहासिक भौतिक वादानें लावलेली अुपपत्ति सर्वांगीण, तर्कशुद्ध आणि प्रमाणपूर्वक (२२) वाटत असल्यामुळे बाकीच्या अुपपत्तींना त्यांनी अर्धचंद्र दाखविणें क्रमप्राप्त आहे. मार्क्सुत्राग्यांची बुद्धिमत्ता फार थोडक्यांच्या ठिकाणीं असल्यामुळे त्यांच्या गळीं ही मार्क्सअुपपत्ति कितपत अुतरेल व त्यांच्या मनाचें ह्या अुपपत्तीनें कितपत समाधान होअील हें सांगतां येत नाही. कागदावर अेंजिनचें कितीहि हुबेहूब चित्र काढलें तरी त्या अेंजिनला गति देण्याचें सामर्थ्य आपणांमध्ये नाही, ह्या विचारानें बहुजनसमाज पूर्वीच्या अर्थानें अध्यात्मवादाकडे वळण्याचा संभव असल्यामुळे शास्त्रीबोवांची भाबडी आशा सफल होवो असें आम्ही मनापासून अिच्छितों. ह्यापुढे सर्वे सुखिनः सन्तु असें न म्हणतां सर्वे सुखिनः सन्ति सर्वे सन्ति निरामयाः। सर्वे भद्राणि पश्यन्ति न कश्चित् दुःखमाप्नोति असें म्हणण्याची संधि लाभणार ह्याचा कोणाला आनंद होणार नाही? हिंदु धर्म हा विशिष्ट लोकांचा धर्म आहे; सर्व मानवांचा नाही. खरा मानवधर्म मार्क्सप्रणीतच होय असें आग्रहपूर्वक प्रतिपादन करणाऱ्या शास्त्रीबोवांना रशिया आणि अिंग्लंड यांची गट्टी असून आज हिंदुस्थानांतील हजारो मार्क्सवादी तुरुंगांत खितपत पडले आहेत ह्याचें विस्मरण झालें असेल असें म्हणण्याचें धाडस आमच्यानें करवत नाही. शब्द आणि कृति ह्यांमध्ये पुष्कळ वेळां कधीहि नष्ट न होणारें अंतर असतें हें शास्त्रीबोवांना सांगावयास नको. ज्या राष्ट्रानें समत्वाच्या तत्त्वाकरिता राज्यक्रांति केली असें म्हटलें जातें त्याच राष्ट्रानें अल्प काळांत प्रचंड साम्राज्य स्थापन केलें ही गोष्ट दुर्लक्ष करण्यासारखी नाही. अिंग्लिश गृहस्थ हा स्वातंत्र्यप्रिय आहे असें म्हटलें जातें. तथापि खरा स्वातंत्र्यप्रिय मनुष्य दुसऱ्याला पारतंत्र्यांत कसा ठेवूं शकतो ह्याचा विचार कोणी करतो असें वाटत नाही. समत्व व स्वातंत्र्य ह्यांची खरी तळमळ ज्याच्या अंतःकरणाला लागली आहे त्याचें आपल्या घरांतील नोकरांशींसुद्धा निराळ्याच तऱ्हेचें वर्तन दृष्टोत्पत्तीस येतें. असें असूनहि चाळीस कोटि लोकांना पारतंत्र्यांत ठेवणाऱ्या राष्ट्राला स्वातंत्र्यप्रेमी म्हणवून घेण्याचा अधिकार कसा पोचतो ह्याची मीमांसा ह्या भौतिक धर्मवादी ग्रंथांत केलेली आढळत नाही.

मार्क्सवादानें भारलेल्या ह्या विद्वान ग्रंथकाराच्या डोळ्यांत कोणतीहि धर्मसंस्था कुसळाप्रमाणें सलत असल्यामुळे हिंदु धर्माबद्दल पराकाष्ठेच्या अवहेलनेचे अुद्गार त्यांनीं काढणें साहजिक आहे. "हिंदु धर्म हा अेक धर्म नाही; तो अेक हीनोच धर्मांचा संग्रह आहे. त्यांत शब्द-

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रामाण्य नाही हें म्हणणें खोटें आहे. प्राचीनतम हीन स्थितींतील अनेक नीच प्रकारच्या धार्मिक आचारविचारांना व चालीरीतींना पावित्र्य दिल्यामुळे हिंदु धर्म हा अेक अजबखाना किंवा पुराणवस्तुसंग्रहालयच बनला आहे. हिंदुधर्मीय मनुष्यं ख्रिश्चन किंवा मुसलमान यांच्या देवतांना भजतात व निरनिराळ्या पंथांच्या देवतांची व गुरूंची आराधना करतात याचें कारण मतस्वातंत्र्य, बुद्धिस्वातंत्र्य अथवा अुदारमनस्कता नव्हे. **हें अेक भोळ्या व भित्र्या स्वभावाचें लक्षण आहे. वाटेल त्या देवतेला व गुरूला शरण जाण्याची प्रवृत्ति मनाचा कमकुवतपणाच दर्शविते.... हिंदु धर्म अुदार नाही, कृपण आहे.** अुपासनासंप्रदायांच्या बाबतींतील शिथिलतेला अुदारता हें नांव आहे. हिंदु धर्माच्या जातिसंस्था व वर्णसंस्था ह्या अनुदारतेच्या मूर्ति आहेत" (१६६–६७). [जाड ठसा आमचा]

"हीन धर्मावर जगणारा पुरोहितवर्गच या धार्मिक गोंधळास व जातिसंस्थेस जबाबदार आहे. ग्रह, भूत, वेताळ, देवता अित्यादिक भ्रांतींवरच जगणाऱ्या वर्गाने लहानमोठ्या जमातींच्या हीन धर्माची राखण स्वतःच्या स्वार्थी प्रवृत्तीमुळे केली. शेकडो देवता, शकुनापशकुन-कल्पना, वेडेवाकडे विधिनिषेध, व्रतवैकल्यें, अुद्यापनें, प्रायश्चित्तें, मुहूर्त, शांति, ग्रहपीडापरिहार अित्यादि प्रकारचा ढोंगधत्तुरा समाजांत कायम राखून स्वतःचें प्रस्थ कायम राखलें." (१७०–७१).

"ब्राह्मणाला कोणत्याहि गुन्ह्याकरिता देहशासन नाही. त्याग, संयम व तप ह्यांपासून चळलेल्या ब्राह्मणाला तर अितर वर्णांप्रमाणेच शिक्षा व दंड पाहिजे; पण वेदांत व स्मृतींत ह्याच्या अुलट आहे. ब्राह्मण व वैदिक आर्य यांना श्रौतस्मार्त कायद्याने अवैदिकांपेक्षा जन्मसिद्ध सवलती व अधिकार फार मोठे ठेवले आहेत. संपत्ति, सत्ता, भोग व मान ह्या बाबतींत ब्राह्मणांस जितक्या सवलती श्रौतस्मार्त कायद्याने ठेवल्या आहेत तितक्या कोणासच नाहीत. त्याग, संयम, ज्ञान व तप ह्यांना त्या कायद्याचे दृष्टीने फारसें महत्त्व नाही" (१८८).

"वैदिक यज्ञ हे फार मागासलेल्या समाजसंस्थेचे द्योतक आहेत" (१००).

अितर धर्मांप्रमाणे हिंदुधर्माची "निर्मिति सत्ताधारी वरिष्ठ वर्गानेच केली आहे"(८२).

"वैदिक पुरोहितवर्गाचें म्हणजेच ब्राह्मणांचें वरिष्ठत्व आणि शूद्रांचें दास्य हें जिचें मुख्य लक्षण आहे अशा समाजसंस्थेला स्थैर्य आणण्याकरिता वेदास अलौकिक प्रामाण्याच्या पदवीस पोहोचविलें" (१११).

"...ब्राह्मणांनी स्वतःच्या अुपजीविकेकरिता सामान्य समाजांतील अज्ञान व देववाद ह्यांचें पोषण केलें" (१९५).

"आर्यांनी अनार्यांना किंवा शूद्रांना, हिंदूंनी अंत्यजांना... धर्माच्या व अीश्वरी संकेताच्या आधारावर दास्यांत व हीन स्थितींत राखण्याचे प्रयत्न केले" (७४).

"आज कर्मविपाकाचा सिद्धान्त शुद्ध वेडेपणाचा ठरला आहे" (७३).

शास्त्रीबोवांच्या मतें हिंदु चालींचें समर्थन करणें म्हणजे आत्मवंचना करणें होय (१५१). दासांचा वर्ग निर्माण करण्याच्या पापाचा घडा ग्रंथकारांनी वैदिक आर्यांच्या डोक्यावर फोडला आहे (८५).

'हिंदु धर्माची समीक्षा' ह्या नांवाखाली हिंदु धर्माच्या नालस्तीचें हें पुराण वाचून ग्रंथकारांत मिस् मेयो संचारली आहे कीं काय असें वाटणें अस्वाभाविक नाही. अज्ञानाचा गंज चढलेल्या हिंदु धर्मांत वर वर पाहणाऱ्याला सर्व घाण दिसल्यास त्यांत आश्चर्य नाही. जेथे घर तेथे शौचकूप असतोच, पण शौचकूपावर दृष्टि खिळवून त्या दुर्गंधीचें वर्णन करणाऱ्याला गृहसौंदर्याचें वर्णन करितां येणें अशक्य आहे. शास्त्रीबोवांनी मार्क्सचें जितकें अध्ययन केलें आहे तितकें जर हिंदु

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

धर्माचें केलें असतें तर त्यांच्या लेखणींतून अितक्या हिडीस रीतीने हिंदु धर्म चितारला गेला नसता.

डॉ. वालावलकर ह्यांनी अिंग्रजींत लिहिलेल्या हिंदु चालींचें समीक्षण आणि लक्ष्मणशास्त्री यांचीं हीं व्याख्यानें यांची तुलना केली असतां अेकच गोष्ट दोन माणसांना कशी विरुद्ध दिसते हें समजण्यासारखें आहे. हिंदु धर्माची समीक्षा या नांवावरूनच कोणत्याहि लेखकाचें अज्ञान दिसून येण्यासारखें आहे. डॉ. वालावलकर ह्यांनी आपल्या ग्रंथाला 'हिंदूंच्या सामाजिक चाली-रीती' हें नांव देऊन विषयाचें समीक्षण करण्याची पात्रता दाखविली आहे. हिंदुधर्मसमीक्षेंत हिंदु धर्माचीं मूलभूत तत्त्वें कोणतीं, त्यांचा विकास कसा होत गेला व त्या तत्त्वानुसारच त्यांमध्ये कोणते दोष अुत्पन्न झाले अित्यादि गोष्टींचा अूहापोह झाला पाहिजे अशी कोणीहि अपेक्षा करणें अिष्ट आहे. परंतु अिंग्रजी विचारांच्या माराने थकून गेलेल्या ग्रंथकारांना ह्या दृष्टीने चिकित्सा करण्याची शक्ति अुरली नसावी. 'हिंदुधर्म' हा मुसलमानी व ख्रिश्चन धर्मांच्या पंक्तीला बसवितां येतो असें मत असणाऱ्या लेखकाच्या हातून हिंदु धर्माच्या समीक्षणाची गाडी रुळां-खाली गेल्यास नवल नाही.

शास्त्रीबोवांच्या मतें "जातिसंस्था हें हिंदु धर्माचें मुख्य लक्षण आहे" (१४९). जाति हिंदुसमाजाचा मुख्य घटक आहे ही गोष्ट खरी, पण हिंदु धर्माचें मुख्य लक्षण म्हणजे जाति-संस्था हें शास्त्रीबोवांना कोणीं सांगितलें समजत नाही. जातिसंस्था हें जर हिंदु धर्माचें मुख्य लक्षण असतें तर शास्त्रकारांना जातिधर्म प्रामुख्याने सांगणें अपरिहार्य होतें; परंतु अेकहि स्मृति-कार जातिधर्म सांगत नाही ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. जातिधर्माला कलाटणी देअून स्मृतिकार वर्णधर्म सांगत असतात. वर्ण आणि जाति ह्यांचा अभेद मानण्यांत शास्त्रीबोवांची अक्षम्य चूक झाली आहे. वर्ण हा शास्त्रनिर्मित असून जाति ही जन्मसिद्ध आहे. शास्त्रीबोवा म्हणतात: चातुर्वर्ण्य व जातिभेद ही संस्थाच कर्मविपाकावर अुभारलेली आहे (७३) ह्या वाक्याचा अर्थच आम्हांस कळत नाही. ब्राह्मणांनी चातुर्वर्ण्य निर्माण केलें असें मानलें तरी जाति निर्माण केली हें म्हणणें हास्यास्पद आहे. आपल्या कल्पनाशक्तीने अनेक जाति कल्पून त्या निरनिराळ्या जातींत तेव्हाचा लोकसमूह ब्राह्मणांनी विभागिला असें शास्त्रीबोवांचें म्हणणें असेल तर तें वादाच्या कक्षेतच येअू शकत नाही असें आम्हांस वाटतें. जातिभेदाचें समर्थन कर्मविपाकाच्या सिद्धान्तावर कधी कधी केलें जातें हें आम्हांस माहीत आहे; परंतु जातिभेदाची अुभारणी कर्मविपाकावर केली (कोणीं ?) ह्या सिद्धान्ताचें आम्हांस आकलनहि करितां येत नाही. चातुर्वर्ण्यपद्धति निर्माण करून ब्राह्मणांनी जातिसंस्थेची नांगीच मोडली ही गोष्ट शास्त्रीबोवांच्या लक्षांत न येण्यास विकारवशता हेंच अेक कारण समजलें पाहिजे.

ब्राह्मणांनी अथवा पुरोहितवर्गाने शूद्रांना दास्यांत ठेवलें हा अेक बालिश आरोप गतकालीन सुधारकांप्रमाणे आजकालच्या शास्त्रीबोवांनी केलेला आहे. शिवाय साहेबाचे शब्द झेलून ते आम्हांस आणखी सांगत आहेत की जिंकलेल्या लोकांना ब्राह्मणांनी शूद्र बनविलें. साहेबांच्या ओंजळीने पाणी पिणाऱ्या लोकांची फसगत झाल्यास त्यांना वाअीट वाटण्याचें कारण नाही. चातुर्वर्ण्य स्थापन केलें त्या वेळीं कोणत्या लढाया झाल्या, कोठे झाल्या, केव्हा झाल्या आणि कोणांमध्ये झाल्या या प्रश्नांवर शास्त्रीबोवांनी प्रकाश पाडला असता तर आमच्यासारख्या अज्ञ जनांवर त्यांचे अुपकार झाले असते. शूद्रांचा चातुर्वर्ण्यांत समावेश करून न घेतांहि त्यांच्याकडून ब्राह्मणांना सेवा करून घेतां आली नसती का ! चातुर्वर्ण्य निर्माण केल्याविना ब्राह्मणांना गत्यंतर नव्हतें, आणि शूद्रांना आंत घेतल्याशिवाय चातुर्वर्ण्य बनत नव्हतें असा पेचप्रसंग ब्राह्मणांवर आला होता असें शास्त्रीबोवांचें म्हणणें असल्यास नकळे ! धर्म-विषयी शास्त्रीबोवांचें मत कांही असो, आमचे स्मृतिकार मात्र धर्माला प्रगतीचें साधन


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अमनत असत. धर्मशास्त्रें चार वर्णांकरिता आहेत म्हणून शूद्रांना धर्म देअून ब्राह्मणांनी त्यांना संस्कृतीच्या मार्गावर आणून ठेवलें ही गोष्ट 'वर्णत्वात् धर्ममर्हति' ह्या वचनावरून सहज समजण्यासारखी आहे. शुश्रूषा हा शूद्रांचा प्रथम धर्म होय. "कृषि, शिल्प व अुच्चवर्ण-सेवा हे तीन व्यवसाय शूद्राला नेमून दिले" (१८६) हें शास्त्रीबोवांचें म्हणणें धादांत खोटें आहे. लक्ष्मणशास्त्र्यांसारख्या माणसानें अितकें अज्ञान प्रकट करावें याचा आश्चर्य राहून राहून खेद होतो. पण हिंदुधर्माची समीक्षा करणें हें नुसतें थोतांड असून या धर्माची निंदा करणें हाच शास्त्रीबोवांचा अंतर्यामी हेतु असल्यामुळे अशा प्रकारचा विपर्यास ज्ञानतः वा अज्ञानतः होणें क्रमप्राप्तच म्हटलें पाहिजे. वर सांगितल्याप्रमाणे शुश्रूषा हा शूद्रांचा मूळचा धर्म प्रथमच्या स्मृतिकारांनी सांगितला आहे. आणि शुश्रूषा याचा मूळचा अर्थ श्रवण करण्याची इच्छा असा आहे. वेदाध्ययन करण्यास असमर्थ असणाऱ्या लोकांना वेदश्रवण करण्यास लावणें ह्यांत कांही पाप आहे असें आम्हांस वाटत नाही. शुश्रूषा याचा सेवा हा अर्थ पाठीमागचा आहे, ही गोष्ट शास्त्रीबोवांच्या लक्षांत यावयास पाहिजे होती. द्विजसेवेबरोबर कृषि व शिल्प यांचा अुल्लेख करून शास्त्रीबोवांनी जी हातचलाखी केली आहे ती धूर्तपणाची असली तरी प्रामाणिकपणाची खचित नाही. शूद्रांची जसजशी प्रगति होत गेली तसतसे निरनिराळे व्यवसाय ब्राह्मणांनी त्यांना लावून दिले हें स्मृति वर वर पाहणारासहि कळून येण्यासारखें आहे. परंतु शूद्रांची ब्राह्मणी धर्मात अुन्नति झाली असें कबूल न करण्याचा निर्धार शास्त्रीबोवांचा झालेला दिसतो. कोठे कांही चांगलें असें शास्त्रीबोवांना दिसलेंच तर तें अवैदिक परंपरेंत निर्माण झालें होतें असा शास्त्रीबोवा आग्रह धरतात (१०५). बरें, ब्राह्मणांनी शूद्रांना गुलाम बनवून आपली सेवा करावयास भाग पाडलें तर ब्राह्मण अुर्फ पुरोहितवर्ग हा मोठा मांडवलवाला वर्ग होता असें म्हणावें लागेल. ग्रंथकाराचें असें जर म्हणणें असेल तर हा त्यांचा शोध अजब आहे असेंच म्हटलें पाहिजे.

वैदिक धर्म हा मानवांचा धर्म नसून अेका गटाचा धर्म होता अशी तक्रार शास्त्रीबोवां करीत आहेत (१९०). शास्त्रीबोवांचें लिहिणें पुष्कळ वेळां संदिग्ध वाटतें. अशा संदिग्ध लिहिण्याचा हा अेक नमुना आहे. वैदिक धर्म मानवांचा धर्म नाही हें वाक्य लिहिण्यांत शास्त्रीबोवांच्या मनांत काय होतें तें नीटसें ध्यानांत येत नाही. वैदिक धर्म हा मानवांचा नसेल, परंतु तो अखिल मानवजातीसाठी आहे आणि होता ही गोष्ट निर्विवाद होय. वैदिक धर्म हा ब्राह्मणांचा, आर्यांचा अथवा त्रैवर्णिकांचा होता असें मानलें तरी त्यांतील तत्त्वें सर्व मानवजातीला लागू पडतील अशा रीतीने त्यांनी धर्माची रचना केली होती. हा वैदिक धर्म अवैदिक लोकसमाजांत हळू हळू कोणाचींहि मनें न दुखवितां प्रसृत करणें हें वैदिक धर्माचें मुख्य लक्षण असल्यामुळे त्याला अखिल मानवधर्माचें स्वरूप प्राप्त झालें आहे. ह्या धर्माची ही थोरवी फक्त डॉ. केतकरांनी ओळखली होती; किंबहुना असेंहि म्हणण्यास प्रत्यवाय नाही की हिंदुधर्माचें तत्त्वज्ञान डॉ. केतकर यांनी जितकें अवगत करून घेतलें होतें व हिंदु धर्माविषयी मत प्रदर्शित करण्यास त्यांना जितका अधिकार होता तितका आज हयात असलेल्या कोणत्याहि व्यक्तीस नाही. स्मृतिकारांनी आपल्या धर्माला हिंदुधर्म हें नांव दिलेलें नाही. हें नांव हल्लीच्या लोकांनी साहेबांच्या अनुषंगाने निर्माण केलेलें आहे. ब्राह्मण व पुरोहितवर्गावर त्यांनी नवीन स्वीकारलेल्या संस्कृतीस अनुसरून शास्त्रीबोवांचा रोष होणें योग्यच आहे; तथापि मनु हा ब्राह्मण नसून क्षत्रिय होता ह्याचें शास्त्रीबोवांना स्मरण करून देणें अनुचित होणार नाही.

हिंदु धर्म म्हणजे हीन चालीरीतींचा अेक संग्रह आहे अेवढाच प्रकार लक्ष्मणशास्त्र्यांच्या स्थूल दृष्टीला दिसतो. पण त्याच्या मागे जी सात्त्विक व अुदात्त क्रिया चालू आहे ती कळण्याला

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अवश्य असणारी सूक्ष्म दृष्टि शास्त्रीबोवांजवळ नाही असें दिसतें. देवीची, शंकराची, लिंगाची, गणपतीची, सूर्यांची अुपासना अनार्य समाजांची होती ही गोष्ट खोटी नाही. परंतु या हीन देवतांचें शुद्धीकरण करून त्या अुपासनेला अुन्नत, अुज्ज्वल स्वरूप देण्याचें महनीय कृत्य वैदिक धर्माने केलें आहे. शुद्धीकरण व अुन्नतीकरण हें वैदिक धर्माचें मुख्य अंग मानलें पाहिजे हें ज्याच्या लक्षांत आलें नाही त्याला हिंदु धर्माचें स्वरूप कळलें आहे असें म्हणता येणार नाही. स्मशानांतल्या चितेचें भस्म लावणाऱ्या शंकराला आज चंदनाचें गंध लावलें जातें व त्याच्यावर रुद्राचा अभिषेक केला जातो ही केवढी प्रगति झाली आहे हें कळण्यास वैदिक धर्माच्या सूक्ष्म अध्ययनाची आवश्यकता आहे. नेपाळांतील पशुपतीला गंध लावण्याकरिता हजारों भक्त हजारों खंडी चंदन देतांना पाहिलें म्हणजे शंकराचें मूळचें स्वरूप किती पालटून गेलें आहे हें प्रत्ययास येतें. चंदन हें विष्णूकरिता आहे, शंकराकरिता नाही, ह्याचें स्मरणहि लोकांना आता राहिलें नाही. वैदिक धर्माच्या ह्या महत्त्वाच्या अंगाकडे विद्वान म्हणविणाऱ्या लोकांनी दुर्लक्ष करावें हें आमचें दुर्भाग्य होय. आज हिंदु-मुसलमानांचें भांडण आहे तसेंच अेके काळीं शैव-वैष्णवांचें होतें. पण 'शिवस्य हृदयम् विष्णुः' आणि 'विष्णोश्च हृदयम् शिवः' या तत्त्वाखाली मांडणें मिटविण्यांत आलीं. आज आम्ही अितिहास विसरल्यामुळे मुसलमानांचें भांडण शिल्लक राहिलें आहे.

प्रत्येक मनुष्य आपल्या बुद्धीप्रमाणे व अनुभवाप्रमाणे बरें वाअीट ठरवीत असतोः अेकाच कृत्यांत अेकाला धर्म दिसेल तर दुसऱ्याला अधर्म दिसेल; अेकच गोष्ट अेकजण सत्य मानतो तर दुसरा आग्रहपुरःसर ती असत्य म्हणून प्रतिपादन करतो. जेथें अेखादा मनुष्य प्रामाणिकपणाचा अुठावदार गौरव करीत असतो तेथेच दुसऱ्याकडून अप्रामाणिकपणाचा निःसंदिग्ध आरोप केला जातो असे अनुभव जगामध्ये वारंवार येत असतात. डॉ. राधाकृष्ण आमच्या धर्मांतील सहिष्णुपणाची मनसोक्त प्रशंसा करतात; अुलट तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री हे हा भ्याडपणा आहे असें मानून खजिल होतात. पण ह्या शास्त्रीबोवांना असें विचारावेसें वाटतें की, मनु आणि याज्ञवल्क्य यांना कोणाची दहशत वाटत होती? मनुस्मृति लिहिली गेली त्या वेळीं मुसलमानी धर्म जन्मास आला नव्हता व खिस्ती धर्माची पोटदुखी सुरू झाली नव्हती. शैव-वैष्णव, पाशुपत, शाक्त, सौर, गाणपत्य अित्यादि विरोधी धर्मांचा वैदिक धर्माशीं खटका अुडाला. ते सर्व विरोधी धर्म आज नेस्तनाबूत झालेले आहेत आणि वैदिक धर्म मात्र कायम राहिला आहे. परमतसाहिष्णुता हा वैदिक धर्माचा केवळ गुण नव्हे, ती त्याची प्रकृति होय. आज शास्त्रीबोवांना हिंदु धर्मापेक्षा मुसलमानी व खिस्ती धर्म श्रेष्ठ वाटतात. अितकें असूनहि खिस्ती पाद्र्यांकडून त्यांच्या मस्तकावर अुदकसिंचन झाल्याविना त्यांना खिस्ती स्वर्गाचें दार बंद आहे. असला खुळचटपणा हिंदु धर्म करीत नाही ह्याचें शास्त्रीबोवांस वाअीट वाटतें! शास्त्रीबोवांचा दृढविश्वास असेल व तदनुसार ते खिस्तांचे अत्यंत भाविक अुपासक बनतील तर हिंदु धर्म त्यांना सद्गति प्राप्त होअील असेंच भेकडपणाने नव्हे तर विश्वासपूर्वक आश्वासन देत आहे. दुसऱ्या कोणत्याहि देवाची अुपासना करा, अखेरीस ती माझीच अुपासना होते असें निक्षून सांगणारा कृष्ण शास्त्रीबोवांनी भित्रा ठरवावा हें त्यांच्या विकारयुक्त बुद्धीसच शोभण्यासारखें आहे. भक्त देवाला आपला दास मानतात हें भेकडपणाचें लक्षण शास्त्रीबोवांच्या मनांत असल्यास त्यांच्या अज्ञानाची कीव करणेंच बरें. देव जर अेक आहे तर त्याला निरनिराळ्या नांवांनी व वेगवेगळ्या अुपकरणांनी भजलें म्हणून भक्तिभेद म्हणजेच धर्मभेद होण्याचें वस्तुतः कांही कारण नाही. फार काय पण लक्ष्मणशास्त्री पूर्ण नास्तिक असले तरीसुद्धा ते जर

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

नीतिसंपन्न असतील तर त्यांसहि हिंदु धर्म नरकांत टाकण्यास प्रवृत्त होणार नाही "न हि कल्याणकृत् कश्चित् दुर्गतिं तात गच्छति". 'अहमेव ब्रह्मास्मि' या तत्त्वज्ञानाचे अनुयायी अेका अर्थाने नास्तिकच आहेत. अन्य धर्माप्रमाणे हिंदु लोक आपलाच धर्म तेवढा अुत्तम समजतात हा शास्त्रीबोवांचा आरोप अज्ञानमूलक आहे हें वरील विवेचनावरून अुघड होअील. हिंदूंचीं धर्मविषयक तत्त्वें अितर धर्मांच्यापेक्षा निःसंशय चांगलीं आहेत. परंतु सद्गतीला ज्या भावनेची आवश्यकता असते ती भावना व्यावहारिक धर्मातील नसते म्हणून तात्त्विक कल्पना किंवा आचार हीं सद्गतीच्या आड येअूं शकत नाहीत. अन्य धर्मांबद्दल वैदिक धर्माने जर द्वेष बाळगला असता तर धर्मांतर करणें हें अेक धर्मच्युतीचें मोठें कारण झालें असतें. परंतु धर्मांतर हा शब्दहि वैदिक वाङ्मयांत आढळावयाचा नाही. खिस्ताची अुपासना पतकरूनहि हिंदु म्हणून राहण्यास हिंदु धर्म तत्त्वतः मना करीत नाही. असा हा धर्म शास्त्रीबोवांच्या मतें भ्याड व हीन ठरतो, आणि शास्त्रीबोवांसारख्या गृहस्थाला केवळ तो खिस्ती धर्म अुपचारतः पतकरीत नाही म्हणून नरकांत ढकलून देणारा खिस्ती धर्म विश्वधर्म मानला जातो हें अेक आश्चर्य आहे.

विज्ञानाने अथवा भौतिक शास्त्राच्या अध्ययनाने धर्मश्रद्धेला खग्रास ग्रहण लागेल असा धीर शास्त्रीबोवा देत आहेत. अीश्वर जर टाकतां आला तर त्याची कास धरण्याचा प्रयत्न करण्याच्या भानगडींत कोणीहि पडणार नाही, पण शास्त्रीबोवांच्या प्रवचनांसारखीं प्रवचनें आजवर लोकांनी अनेकांकडून अैकलीं आहेत, आणि असें असूनहि अीश्वराची मगरमिठी बहुजनसमाजावर कायमच आहे. वॉलेस् अथवा डार्विन यांचा विकासवाद त्याचप्रमाणे मार्क्सचे सिद्धान्त जगापुढे येअून बराच काळ लोटला तथापि समाज नास्तिकवादाकडे झुकलेला दिसत नाही; अुलट सर ऑलिव्हर लॉजसारखे शास्त्रज्ञ मृत्यूनंतर आत्मा राहतो या गोष्टीवर विश्वास ठेवीत आहेत. भौतिक शास्त्रांच्या योगाने सृष्ट पदार्थांत धर्म आहेत त्यांचें आपणांस ज्ञान होअील, परंतु त्या पदार्थांत धर्म निर्माण करितां येणार नाहीत. अग्नीचें कार्य पाण्याकडून करवून देणारा प्राणी अद्यापि निर्माण झाला नाही. अीश्वराचा आधार झुगारून दिल्यावर नीतितत्त्वें समाजाने अगर व्यक्तीने कां पाळावीं याचें समाधानकारक अुत्तर देणें शास्त्रीबोवांसारखें आम्हांस सोपें वाटत नाही. अेखादी गोष्ट वाअीट आहे असें आपण म्हणतों त्या वेळेस ती गोष्ट खरोखर वाअीट आहे म्हणून आपण तसें म्हणतों कीं आपल्या बुद्धीला तसें वाटतें म्हणून म्हणतों हा विचार विवेकी माणसाला सुचत असतो. आपल्याला वाटतें म्हणून गोष्ट वाअीट आहे असें मानल्यास आपल्याला तसें कां वाटतें ह्याचें कारण शोधून काढावें लागतें. अेकंदरीत, अलौकिक शक्ति मार्क्सवाद मान्य करूनहि लोकांच्या श्रद्धेचा विषय राहणार.

अध्यात्म झूट आहे हें ठासून सांगण्यापूर्वी अध्यात्म ही केवळ कल्पना नसून अनुभवसिद्ध गोष्ट आहे असें म्हणणाऱ्या योगशास्त्राचा विचारहि या प्रबंधांत केलेला आढळत नाही.

वैदिक धर्मामध्ये शब्दप्रामाण्य नाही असें सांगणाऱ्या राधाकृष्णांना लक्ष्मणशास्त्री ह्यांनी मूर्खांत काढलें आहे. परंतु शास्त्रीबोवांनी थोडा अधिक विचार केला असता तर त्यांना आपणच चुकत आहोंत असें कदाचित् वाटलें असतें. शब्दप्रामाण्य हा शब्द मोघम अर्थाने वापरून हिंदूंतील निरनिराळ्या समाजांचे धर्मग्रंथ असून तेच त्यांचे प्रमाणग्रंथ आहेत असें शास्त्रीबोवांचें म्हणणें आहे. आता श्रुति हें सर्वश्रेष्ठ प्रमाण लौकिकदृष्ट्या समजलें जातें; परंतु हा श्रुतीचा भोपळा कमरेला बांधून पाण्यांत तरंगणाऱ्या माणसास हिंदु धर्म आत्यंतिक सद्गतीचें आश्वासन देत नाही; कारण वेद हे त्रिगुणान्वित असून मोक्षप्राप्तीसाठी माणसाला निस्त्रैगुण्य व्हावें लागतें अशी शिकवण हिंदूंचें तत्त्वज्ञान हिंदूंना देत असतें. श्रुतींची जेथे किंमत नाही

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

तेथे कर्माची किंवा आचाराची किंमत किती असणार हें तारतम्याने कोणत्याहि विवेकी माण-साला ठरवितां येईल. कर्म हें अुन्नतिकारक असतें तसें अवनतीला नेणारेंहि असतें. आणि कोणतेंहि धार्मिक कर्म चित्तशुद्धीकरता आहे; यापेक्षा त्यास अधिक महत्त्व नाही. हल्ली केवळ अज्ञानामुळे कर्माला फाजील महत्त्व दिलें गेलें आहे. मुख्य गोष्ट अशी की धर्म मनुष्याला असतो, पशूंना नसतो. सत्य, अहिंसा, त्याग, अस्तेय, शम, दम अित्यादि गीतेंत वर्णिलेले सामान्य धर्म अथवा मनुष्यत्वाचे गुण ज्यांच्यामध्ये वसत नाहीत त्यांना कर्म केल्याने किंचितहि सत्फल मिळण्याची आशा नको. कर्म हें वैयक्तिक आहे, सामाजिक नाही; परंतु सत्य, अहिंसा अित्यादि गुण सामाजिक आहेत. सारांश, आचारधर्माचें क्षेत्र फारच क्षुद्र आहे. अशा तऱ्हेची हिंदु धर्माची पार्श्वभूमि रेखाटतां येईल. म्हणून आमचें म्हणणें असें की हिंदु धर्मांत सार कोणतें, असार कोणतें ह्याचा विवेक प्रत्येकाने केला पाहिजे. ज्या ठिकाणीं शब्दप्रामाण्य आहे त्या ठिकाणीं रूढीचा अंमल चालत नाही. हिंदु धर्म तर रूढीने बद्ध झालेला आहे या अेकाच गोष्टीवरून हिंदुसमाज शब्दप्रामाण्यवादी नाही ही गोष्ट शास्त्रीबोवांच्या लक्षांत यावयास पाहिजे होती. खिस्ती व मुसलमानी धर्मांत शब्दाचें प्रामाण्य असल्यामुळे रूढीला थारा मिळाला नाही.

अेकंदरींत मतप्रचार म्हणून शास्त्रीबोवांनी आपलें काम अुत्कृष्टपणें बजावलें असलें तरी त्यांच्या व्याख्यानांनी लोकांच्या ज्ञानांत भर पडेल असें आम्हांस वाटत नाही. प्रस्तुत व्याख्यानां-मुळे नागपूर विद्यापीठाच्या लौकिकांत भर पडेल असेंहि आम्हांस वाटत नाही. 'निरनिराळ्या प्रकारचे धार्मिक अनुभव' या विषयावर प्रो. जेम्स् यांनी अेडिंबरो विद्यापीठांतील विद्यार्थ्यां-समोर जीं व्याख्यानें दिलीं त्यांच्याशीं लक्ष्मणशास्त्र्यांच्या व्याख्यानांची तुलना केली असतां हीं व्याख्यानें किती कमी दर्जाचीं आहेत हें सहज दिसून अेण्यासारखें आहे. विद्यार्थ्यांच्या पुढे व्याख्यानें द्यावयाचीं असलीं तरी व्याख्यात्यामध्ये अभ्यासकाची वृत्ति असणें अवश्य असतें. अशा प्रकारची वृत्ति म्हणजे ज्ञानलालसा डॉ. जेम्स् यांच्यामध्ये असलेली प्रत्ययास येते. याच्या अुलट नागपूर विद्यार्थ्यांच्यापुढे शास्त्रीबोवा आपल्या अधार्मिकतेचें वक्तृत्वनिष्ठ प्रदर्शन करीत आहेत असा ग्रह होतो. पुस्तकाची अशुद्ध छपाअी ही तर विद्यापीठाच्या प्रकाशनाला न शोभण्या-सारखी गोष्ट आहे. शास्त्रीबोवांना धर्माप्रमाणे अनुस्वारांचीहि नावड आहे असें दिसतें. ग्रंथ निरनुस्वार छापला आहे म्हणावा तर नकोत तेथेहि अनुस्वार दिलेले आढळतील. हिंदूंच्या धर्मापेक्षा मुसलमानांचा धर्म शास्त्रीबोवा अधिक पसंत करितात म्हणूनच कीं काय चालू व सुरू या दोन शब्दांवर आवर्जून अनुस्वार दिलेले आढळतील. शास्त्रीबोवांना धर्माचें महत्त्व वाटत नाही याचें निदर्शक म्हणूनच कीं काय महत्त्व शब्द फारच थोड्या ठिकाणीं शुद्ध लिहिलेला आढळेल. धर्म ही मानवजातीची अफू आहे या विचाराने प्रेरित होअून हें समीक्षण केलें नाही असें शास्त्रीबोवा प्रस्तावनेंत सांगतात. शास्त्रीबोवांची प्रेरणा कांहीहि असो, त्यांचें सर्व समीक्षण धर्म ही अफू आहे याच विचाराने झालेलें दिसतें. धर्माची समीक्षा सर्व समीक्षेचा खरा प्रारंभ होय, ह्या कार्ले मार्क्सच्या विचाराची प्रेरणा या समीक्षेच्या मुळाशीं आहे याचा सर्व समीक्षण वाचूनहि आम्हांस बोध होत नाही. ह्या वाक्यावर पुष्कळ टीका करितां येणें शक्य आहे पण ती न केलेलीच बरी.

शास्त्रीय दृष्टीचा पुरस्कार करणाऱ्याच माणसाची शास्त्रीय दृष्टि सुटली म्हणजे चांग-ल्याची अपेक्षा करणें व्यर्थ होय. असो. ईश्वरालाहि दास बनविणारा हिंदुसमाज आज अर्थ-हीन आचारांचा दास बनला आहे. या दास्यांतून त्याची सुटका करण्याचें श्रेय लक्ष्मणशास्त्री जोशी यांस मिळवितां आलें नाही ह्याचें वाअीट वाटतें.

ना. गो. चा.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## शास्त्र

**लघुरत्नपरीक्षा**– ले० म. ल. खांबेटे; प्रका० श्री. दा. ना. मोघे, स्कूल अँण्ड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; मूल्य रु. २॥.

रत्नप्रदीप खंड १ व २ अशीं रत्नांवरील माहितीने भरलेलीं मोठालीं दोन पुस्तकें वरील ग्रंथ-कर्त्याने प्रसिद्ध केलेलीं आहेत. त्यांच्या किंमती फार व या दिवसांत पुनर्मुद्रण करणें खर्चाचें असल्याने या किंमती कमी होणें अशक्य; त्यामुळे 'लघुरत्नपरीक्षा' या नांवाचें लहान पुस्तक तयार करून प्रसिद्ध केलें आहे. मोठ्या ग्रंथाच्या मानाने यांत माहिती कमी असणार हें साहाजिकच आहे. तरी ज्यांनी थोरलीं पुस्तकें पाहिलीं नाहीत त्यांना या लघुग्रंथांत सर्व जरूर ती माहिती आली आहे असेंच वाटेल. पुस्तकांत दोन विभाग केलेले आहेत. पहिल्या विभागास 'व्यावहारिक विभाग' म्हटलें आहे व दुसऱ्या विभागास 'शास्त्रीय विभाग', म्हटलें आहे.

पहिल्या विभागांत रत्नांची अुत्पत्ति, त्यांचें संक्षिप्त वर्णन, रत्नांची परीक्षा, सांकेतिक भाषा व त्याशिवाय आणखीहि अुपयुक्त माहिती दिलेली आहे. ज्यांना रत्नांचा व्यवहारच फक्त करावयाचा आहे त्यांना पहिल्या भागांतील माहिती पुरेशी आहे, परंतु शास्त्रीय अभ्यास करणारांना शास्त्रीय विभाग फार अुपयुक्त आहे असें दिसून येअील. हें पुस्तक रत्नांचा व्यापार करणारे, व रत्नें वरचेवर खरेदी करणारे यांना तर अुपयोगी आहेच, परंतु सर्वसाधारण जिज्ञासु वाचकालाहि हें पुस्तक मनोरंजक माहितीने भरलेलें आहे असें आढळेल.

जगांतील प्रसिद्ध रत्नें प्रथम कोठें सापडलीं, निरनिराळ्या लोकांच्या हातून कशीं गेलीं व आज कोणांजवळ आहेत ही हकीकत वाचण्यास फारच मनोरंजक आहे. कृत्रिम मोतीं, कल्चर्ड मोतीं व बसराअी मोतीं कशीं करतात किंवा होतात, त्यांच्यांत फरक काय, त्यांचा अुपयोग कसा करवा, तीं ओळखावींत कशीं ही माहिती विशेष महत्त्वाची आहे. कल्चर्ड मोतीं व बसराअी मोतीं कशीं ओळखावीं यासाठी नक्की रीति शोधण्याकरता खर्चाकडे न पाहतां अुत्तम प्रकारचीं मोतीं फोडून, स्वतः ग्रंथकर्त्याने प्रयोग केले व त्या प्रयोगांचें वर्णन पुस्तकांत दिलें आहे. पुस्तक वाचतांना अेखादें अद्भुत गोष्टींचें पुस्तक वाचल्यासारखा आनंद होतो.

पुस्तकांत सुरुवातीला रत्नांचीं रंगीत चित्रें दिलीं आहेत. तींहि फार मनोहर आहेत. पुस्तकांत अुपयुक्त कोष्टकांचीं परिशिष्टें दिलेलीं आहेत. याप्रमाणे पुस्तक सर्व दृष्टींनी अुपयुक्त व मनोरंजक झालेलें आहे. या पुस्तकाने मराठी भाषेंत ग्रंथांचें अेक दालन अुघडलें आहे व तें काम अुत्तम साधलें आहे. हें पुस्तक सर्वांनी अुत्तेजन देण्यायोग्य आहे.

द. ल. स.

## शिक्षणशास्त्र

**१ बालविद्यार्थ्यांची शब्दसंपत्ति**—ले० प्रा. सखाराम राघजी भट; प्रका० श्री. आ. रा. भट, २५६।४ सदाशिव, पुणें २; मूल्य रु. १।

**२ शिक्षणाचें क्षेत्र**—ले० व प्रका० श्री. बापू वासुदेव देवधर, २९३ रास्ता, पुणें २; मूल्य रु. १॥.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

३ प्रश्नोत्तर शिक्षणशास्त्र व मानसशास्त्र—ले० श्री. 'शिक्षणानुभवी;' प्रका० श्री. र. वि. साने, ५७० शनिवार, पुणें २; मूल्य आ. १०.

अध्यापक-विद्यालयामध्ये मानसशास्त्राचें अध्ययन आवश्यक असल्यामुळे मराठी भाषेंत त्या शास्त्रावरील पुस्तकें लिहिण्याचे प्रयत्न सुरू झाले. अशा प्रयत्नांपैकीच प्रा. स. रा. भट यांचें 'बालविद्यार्थ्यांची मराठी शब्दसंपत्ति', प्रा. बा. वा. देवधर यांचें 'शिक्षणाचें क्षेत्र', व 'शिक्षणानुभवी' यांचें 'प्रश्नोत्तर शिक्षणशास्त्र व मानसशास्त्र' हीं तीन पुस्तकें होत.

'बाल विद्यार्थ्यांची मराठी शब्दसंपत्ति' हें पुस्तक प्रा. भट यांनीं 'मास्टर ऑफ अेज्युकेशन' या पदवीसाठी लिहिलें आहे. मुंबअी शहरांतील ५ ते ९ वर्षें वयाच्या बाल विद्यार्थ्यांच्या शब्दसंपत्तीची वयोवार वाढ हा या पुस्तकांतील मुख्य विषय होय. आरंभीं लहान मुलांच्या भाषेचें स्वरूप कसें असतें याचें विवरण करून लेखकाने सामान्योपयोगी शब्द-संग्रहासंबंधीची संशोधनपद्धति स्पष्ट केली आहे. मुंबअी शहरांतील नगरपालिकेच्या प्राथमिक शाळेंत अभ्यास करणाऱ्या मुलांच्या व्यक्तिगत व संघशः कसोट्या घेअून शब्दांच्या याद्या तयार केल्याचा निर्वाळा लेखकाने फलनिष्पत्ति म्हणून दिला आहे. परीक्षा घेतलेल्या मुलांची संख्या अेक हजार आहे. सहावें वर्ष चालू असलेल्या मुलाला ५०० शब्द माहीत असतात व दहावें वर्ष चालू होतांच ती शब्द संपत्ति ४१०० पर्यंत जाते. शेवटीं प्राथमिक शाळांतील शिक्षकांना या शब्दसंग्रहाचा अुपयोग किती प्रकारांनी होअूं शकेल याचेंहि विवेचन करण्यांत आलें आहे.

या क्षेत्रांत शब्दसंपत्तीच्या वाढीसंबंधी केलेला हा 'अल्पसा प्रयत्न' आहे असे लेखकाने जे अुद्गार काढले आहेत, ते लक्षांत घेअूनहि असेंच म्हणावें लागतें की, लेखकाचा हा 'अल्पसा प्रयत्न'हि मराठी शिक्षणक्षेत्रांत बहुमूल्य आहे. या विषयावरील मराठींतील हें पहिलेंच पुस्तक आहे म्हणून त्याचें स्वागत करणें व लेखकाचें हार्दिक अभिनंदन करणें हें आपलें कर्तव्य होय.

प्रस्तुत संशोधनांत योजण्यांत आलेली संशोधनपद्धति शास्त्रशुद्ध आहे व संशोधकांनी श्रमहि बरेच घेतले आहेत. निष्कर्षाच्या बाबतींत मात्र मतभेद असूं शकेल, कारण शब्दसंपत्ति ठरवितांना अेक हजार विद्यार्थ्यांवरच भिस्त ठेवणें तितकेसें शास्त्रसंमत असेल असें वाटत नाही. पुस्तकाच्या शेवटीं दिलेल्या शब्दांच्या याद्या सूक्ष्मतया अभ्यासिल्या तर त्यांत त्या त्या वयामानाप्रमाणे आणखी बरेच शब्द येअूं शकतील असें वाटतें. तिसऱ्या प्रकरणांत पाश्चिमात्य देशांतील सहाव्या व दहाव्या वर्षांच्या मुलांची शब्दसंपत्ति अनुक्रमें ३६०० व ५४०० दिली आहे त्यावरून आपल्याकडील ५०० व ४१०० ही शब्द संपत्ति फारच कमी दिसते व या कमीपणाचीं कारणें देतांना साधित शब्दांचा अभाव असें अेक कारण दिलें आहे. नेतो, नेला, नेअील, नेअून, नेतांना इ० नेणें या क्रियापदाचीं निरनिराळीं रूपें त्याचप्रमाणे क्रियापदाचीं प्रयोजक रूपें इ०चा अंतर्भाव या शब्दसंग्रहांत केला नाहीं असें प्रा. भट म्हणतात. आमच्या मतें क्रियापदाचीं हीं विविध रूपें वाक्यांमध्ये स्वतंत्र स्वरूपांत योजण्यांत येत असल्यामुळे त्यांचीं स्वतंत्र रूपें म्हणून मोजदाद झाली पाहिजे. अशी मोजदाद केली म्हणजे मूळ शब्दसंग्रहांत बरीच भर पडेल.

प्रा० भट यांचा हा प्रयत्न मुंबअीपुरताच मर्यादित आहे. या पुस्तकाने या बाबतींत आधारभूत साधनें निर्माण केलीं आहेत. त्या साधनांच्या आधारावर महाराष्ट्रांतील तालुका-

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

निहाय, निदान जिल्हानिहाय, प्रयत्न झाले तरच मराठींतील मुलांच्या त्या त्या वयोगटांतील शब्द संग्रहाच्या शास्त्रशुद्ध याद्या तयार होऊन शिक्षणक्षेत्रामध्ये मरीव कामगिरी होईल. डॉ० भट यांनी सुरू केलेला हा स्तुत्य प्रयत्न असाच पुढे चालू राहील व त्यांच्याच मार्गदर्शनाखालीं मोठ्या प्रमाणांत अशा प्रयोगांची आंखणी होईल अशी आम्ही आशा बाळगतों.

'शिक्षणाचें क्षेत्र' या पुस्तकाचे लेखक प्रा. देवधर यांना त्यांचा शिक्षणक्षेत्रांतील बऱ्याच वर्षांचा अनुभव मार्गदर्शन करण्यासाठी सिद्ध आहे. प्रा. देवधर हे अेक नामांकित शिक्षक असून अध्यापनकलेंतील त्यांचें यश सर्वमान्य आहे. त्यांच्या या ग्रंथावर सहजासहजीं दृष्टि फिरवणाऱ्या सामान्य वाचकासमुद्धा ग्रंथकाराचा शिक्षणक्षेत्रांतील गाढ अभ्यास, तर्कशुद्ध विवेचन आणि अनुभवसिद्ध व्यावहारिक सूचना यांचा पदोपदीं प्रत्यय येअील. ग्रंथाच्या २२६ पृष्ठांत शिक्षणशास्त्राचें 'महाभारत' लिहिण्याचा ग्रंथकाराचा प्रयत्न वाखाणण्याजोगा आहे; परंतु ह्याच गुणामुळे ग्रंथांत थोडे फार दोषहि राहिले आहेत. शिक्षणशास्त्रांतील बहुतेक सर्व विषयांचा परामर्श घेण्यांत आल्यामुळे प्रत्येक विषयाच्या बाबतींत पराकाष्ठेची घाअी होणें क्रमप्राप्तच होतें. शाळांचे प्रकार, शिक्षणाचे प्रकार, शिक्षकांचा प्रश्न, पालकांचा प्रश्न, शालेय व्यवस्था आणि कारभार, पाठपद्धति आणि मानसशास्त्र असे अेकापेक्षा अेक महत्तर आणि महत्तम विषय या ग्रंथांत विवेचित केले आहेत.

ह्या विविध विषयांपैकी प्रत्येक विषयावर स्वतंत्र ग्रंथ लिहिणें शक्य आहे अेवढा या विषयांचा विस्तार असल्यामुळे प्रस्तुत ग्रंथांत त्यांचें त्रोटक विवेचन केल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. अेवढें मात्र खरें की सामान्य वाचकास आणि शिक्षणक्षेत्रांत पदार्पण करणाऱ्या नवीन शिक्षकास त्या ग्रंथाच्या वाचनानें बराच फायदा होअील आणि बरीच माहितीहि मिळेल. अध्यापकशाळेंतील शिक्षकांना परीक्षेच्या तयारीसाठी तर हा ग्रंथ फारच अुपयोगी पडेल.

शास्त्रीय दृष्टीने पाहणाऱ्याला मात्र या ग्रंथांत ठिकठिकाणीं बरेच खटके बसतील. भाषेच्या शिथिलपणामुळे विवेचनाला बाध येणें साहजिक असतें. "खरें शिक्षण म्हणजे शरीर, मन, शील व आत्मतेज अुत्साही बनवणें होय" (पृ० ७), "त्यांना हालचाल व चळवळ पूर्ण करून घेण्याचे वातावरण शाळागृहांत निर्माण करा" (पृ० ६), "जेवणासाठी अेक भव्य भोजनगृह असून अितस्तत: लहान लहान खोल्या व छायावृक्ष लावलेले आहेत" (पृ० २२) अि० वाक्यें अुदाहरणादाखल पाहावीं. शास्त्रीय परिभाषा या दृष्टीनेहि पुढील शब्द व शब्दसमुच्चय विचारणीय आहेत. 'हालचाल' (Action), 'जीवनशिक्षण' (Basic education) 'अनुद्बुद्ध मन' (Unconscious), 'योजनापद्धति' (Dalton plan) 'लकबी' (Mannerisms) 'आत्म-प्रतिष्ठा' (Self-expression).

पुढील शास्त्रीय विधानांतील दोष चटकन् ध्यानांत आल्याविना राहणार नाही. "बौद्धिक चाचणींत ६० ते ८० च्या दरम्यानचीं तीं मागासलेलीं मुलें", "प्राणी व वनस्पति यांचे सृष्टिज्ञान नीट देणें", "मी मध्यम आहें अशा मुलाचा स्थितिगंड" अित्यादि.

अेकंदर ग्रंथांत शालेय व्यवस्था आणि अध्ययनाध्यापनपद्धति कशी आदर्श असावी याचाच प्रामुख्याने विचार केला गेल्यामुळे सद्य:कालीन परिस्थितीकडे लेखकाचे दुर्लक्ष झालेलें दिसतें. आहे या परिस्थितींत काय सुधारणा करतां येतील याबद्दलच्या ग्रंथकाराच्या सुस्पष्ट कल्पना फार अुपयुक्त ठरल्या असत्या. पाश्चात्य शिक्षणपद्धति व शालेय व्यवस्था यांचा आदर्श आपल्या-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पुढे ठेवणें अयोग्य आहे असें कोणी म्हणणार नाही; परंतु त्यांत देशस्थितीप्रमाणे योग्य ते बदल करणें आवश्यक असतें.

या पुस्तकांतील अत्यंत परिणामकारी भाग म्हणजे ग्रंथकाराने सद्यःपरिस्थितीबद्दल ठिक-ठिकाणीं व्यक्त केलेले स्वानुभव व तत्संबंधीचें विवेचन हे होत.

प्रकरण ५ मधील सुरुवातीच्याच परिच्छेदांत वर्गपालटीसंबंधी व मुलांच्या होणाऱ्या कुचंबणेसंबंधी ग्रंथकाराने व्यक्त केलेले विचार कटु असले तरी सत्य आहेत यांत शंका नाही. अनिष्ट मुलांना सुधारण्याचा अुपाय म्हणून सुचविलेल्या अुपायांत पालक व शिक्षक यांचा संबंध कसा असावा यासंबंधीचें विवेचनहि विचारणीय आहे. स्त्री-शिक्षणाच्या प्रश्नांतहि आपली स्पष्ट मतें ग्रंथकाराने वाचकासमोर ठेवलेलीं आहेत. लैंगिक शिक्षणाच्या बाबतींत ग्रंथकाराने व्यक्त केलेली विचारसरणी विवाद्य असली तरी नव्या शिक्षणांतील लैंगिक शिक्षणाचा प्रश्न ग्रंथकाराने योग्य रीतीने विवेचिला आहे. या सर्व प्रश्नांत तपशीलासंबंधी मतांतरें असतील, परंतु तत्त्वांची नापसंती क्वचितच असूं शकेल. वर्धायोजनेचें स्वागत ग्रंथकार अत्यंत हार्दिक तऱ्हेने करीत आहे व वर्धायोजना यशस्वी करण्याच्या बाबतींत कोणत्या मनोवृत्तीचे शिक्षक पाहिजेत या बाबतींत ग्रंथकाराने व्यक्त केलेल्या मताशीं सहमत होणें अशक्य नाही.

अशा रीतीने शिक्षणशास्त्राचा सर्वांगाने विचार ज्यांत केलेला आहे असे हें 'शिक्षणाचे क्षेत्र' मराठी भाषेंत फार अुपयुक्त ठरेल यांत शंका नाही.

" शिक्षणशास्त्र व मानसशास्त्र " या पुस्तकाचा निर्मितिहेतु अत्यंत मर्यादित आहे. प्राथमिक शिक्षकांच्या ट्रेनिंगचा विचार करण्यासाठी नेमलेल्या मोरेसमितीने ट्रे. कॉलेजसाठी तात्पुरता असा अेक नवीन अभ्यासक्रम आंखला आहे. त्यांतील शिक्षणशास्त्राच्या अभ्यासक्रमाला धरूनच प्रस्तुत पुस्तक लिहिलें असल्यामुळे ट्रेनिंग कॉलेजच्या अंतिम परीक्षेस बसूं अिच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांना या पुस्तकाचें फारच साहाय्य होणार आहे.

प्रस्तुत पुस्तकाचे मुलांचें मानसशास्त्र, शिक्षणपद्धति आणि शालेय व्यवस्था असे तीन भाग असून प्रत्येक भागांत त्या त्या विषयासंबंधीच्या प्रश्नांचा विचार तर्कशुद्ध पद्धतीने केलेला आहे. विवेचन सोपें व्हावें म्हणून अधूनमधून दिलेलीं अुदाहरणें दररोजच्या व्यवहारांतील असल्याने तो तो विषय चटकन् ध्यानांत येण्यास ह्या अुदाहरणांचें फारच साहाय्य होतें पुस्तकांत वापरलेल्या पारिभाषिक संज्ञाहि अर्थपूर्ण आहेत. विद्यार्थ्यांप्रमाणे शैक्षणिक मानसशास्त्राची ओळख करूं अिच्छिणाऱ्या सामान्य वाचकांसहि प्रस्तुत पुस्तक अुपयुक्त होअील.

काश्यप

## चरित्र

**न्यायमूर्ति रानडे** (स्वतंत्र भारताचे द्रष्टे)– ले० प्रा. द. गो. कर्वे; अनु०– श्री. गो. म. कुलकर्णी; प्रकाशक– आर्यभूषण मुद्रणालय, ९१५।१ शिवाजीनगर, पुणें ४; मूल्य रु. ३.

या ग्रंथाच्या पहिल्या भागांत त्रोटकपणें न्या. रानडे यांची 'जीवनकथा' वर्णिली आहे. ब्रक्य तों प्रतिपक्षाचा संबंध न आणतां लेखविषयव्यक्तींचें महत्त्व दाखविणाऱ्या गोष्टींचें मार्मिक स्पष्टीकरण करीत हें लहानसें प्रकरण लिहिलें आहे. त्यांतील संयम मोठा वाखाणण्या·

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

सारखा आहे. महर्षि रानडे यांची भूमिका काय होती तें विशद करीत दोन्ही बाजू मांडल्या-मुळे त्यांच्या द्वितीय विवाहासारख्या वादग्रस्त प्रकरणाचें विवेचनहि उद्बोधक झालें आहे आणि न्यायमूर्तींची भूमिका समजावतांना जसा आदर ठेवला आहे तसाच आदर प्रतिपक्षीय लोकाग्रणींनीहि महर्षींची योग्यता ओळखलेली होती ही गोष्ट नमूद करतांना त्यांनी दाखविला आहे.

'जीवनकथे'नंतर त्यांचें 'जीवनविषक तत्त्वज्ञान' देऊन पुढे त्यांच्या व्यक्तिमत्वाच्या हिऱ्याचे विविध पैलू त्यांवरील मत दूर करून स्वच्छ स्वरूपांत लोकांपुढे मांडले आहेत. न्या. रानडे हे मनाने व हृदयाने 'धार्मिक' होते, म्हणजे ते 'मानवधर्मी' होते. त्यांचें अन्तःकरण 'विष्णुदास' तुकारामासारखें 'मेणाहुनी मऊ' होतें. या विशाल भूमिकेवरूनच ते भारताच्या जीवनव्यवहाराचें निरीक्षण करीत होते; त्या जीवनव्यापारांच्या निरनिराळ्या प्रांतांत त्यांची तीक्ष्ण जिज्ञासु बुद्धि अविरत संचार करीत होती, आणि पाहिलेल्या गोष्टींचें पूर्ण आकलन करण्यासाठी त्यांची अभ्यासू वृत्ति नेहमीच जागरूक होती; त्यामुळेच त्यांना समाजाच्या धार्मिक, आर्थिक, सामाजिक, राजकीय (आणि साहित्यिक) क्षेत्रांत काय काय दोष आहेत ते दिसले आणि त्यांनी त्यांचें अचूक निदान आणि बहुतेक वेळां औषधियोजना हीं करून ठेविलीं. प्रा. कर्वे यांनी यांपैकी बहुतेक बाजूंचा चिकित्सक पद्धतीने विचार करून महर्षींचें 'क्रान्तदर्शित्व' स्पष्ट केलें आहे.

मराठीमध्ये रानडेचरित्र अजूनपर्यंत अेकच अुपलब्ध होतें. त्यांत जरी न्या. रानड्यांच्या लेखांतील अुतारे देअून त्यांचीं मतें जागोजाग दिग्दर्शित केलेलीं आहेत तरी त्यांच्या त्या त्या मतांची तौलनिक चिकित्सा त्यांत नाही. तो ग्रंथ विशेषतः चरित्रात्मक आहे. अुलट प्रस्तुत ग्रंथांत त्यांच्या प्रत्येक क्षेत्रांतील कामगिरीचें फक्त वर्णन नसून त्या कामगिरीचें सूक्ष्म विश्लेषण आहे आणि त्याच्या अनुरोधाने ते 'सर्वज्ञः स हि माधवः' या वर्णनाला कसे संपूर्णपणें लायख आहेत तें दाखविलें आहे. त्यांची धार्मिक वृत्तीची आवड, भारतीय अर्थशास्त्रांत स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाचा पुरस्कार आणि आर्थिक नियोजनाची जरूरी किंवा शिवाजीच्या व मराठ्यांच्या थोरवीचें गुणगान यांत कांही संकुचित धर्माभिमान-देशाभिमान नाही. तसेंच त्यांच्या समाज-सुधारणेंत केवळ 'नवीना'ची आवड किंवा मोहिनी नाही. सर्वच बाबतींत रानडे यांची दृष्टि मूलग्राही होती; "अिंग्रजांचें येथें येणें ही 'अीश्वरेच्छा' आहे" किंवा "परदेशी मांडवलावरहि स्वदेशी कारखाने अुभारावे," यांसारखीं त्यांचीं मतें आज आपणांस पूर्णपणें पटत नाहीत, पण त्यांच्या मागची त्यांची सात्त्विक किंवा तात्त्विक भूमिका स्पष्ट समजावून घेतल्यावर आपण त्या मतांबद्दल न्या. रानडे यांना दोष देअूं शकणार नाही. परिस्थिति आणि तत्त्व यांची सांगड घालण्याची त्यांची ती समाजोद्धारक दृष्टि समजून घ्यावयास या प्रबंधाची अुत्तम मदत होअील. न्या. रानडे यांच्या संबंधीच्या वाङ्मयांत ही अुत्तम भर आहे, मात्र मराठी भाषेच्या दृष्टीने पाहतां या ग्रंथाला दुय्यम महत्त्व आहे, कारण मूळ ग्रंथ अिंग्रजींत लिहिला गेला आहे. त्याचा अनुवाद श्री. गो. म. कुलकर्णी यांनी केला आहे. पण मूळ लेखकाची शैलीच निरलंकृत व रूक्ष असल्यामुळे आडांतच नसलेली रसवत्ता पोहऱ्यांत येणार कोठून? मूळ ग्रंथाला तावडतोब मराठी वेष चढविण्यांत प्रा. कर्वे यांनी दाखविलेली जागरूकता मराठी भाषेच्या अभिमान्यांना जरी आनंददायीच वाटली तरी भाषाशैलींतील खडबडीतपणा, व्याकरणांतील दूरान्वय हीं पाहतां अजूनहि सफाअीचा हात त्यावरून फिरणें अवश्य होतें असेंहि म्हणावें लागेल. शिवाय न्या. रानडे यांचें मराठी भाषा व साहित्यासंबंधींचें प्रेम, त्यांनी विश्वविद्यालयांत

मराठीचा अभ्यास दाखल करण्यासाठी केलेले प्रयत्न, वसंतव्याख्यानमाला किंवा (स्थूल स्वरूपांत) साहित्यसंमेलन यांची त्यांनी केलेली सुरवात या गोष्टींचें विवेचनहि 'स्वतंत्र भारताचे द्रष्टे' म्हणून त्यांचें श्रेष्ठपण अजमावतांना करणें आवश्यक होतें. प्रा. कर्वे यांना त्याचें व्यक्तिशः महत्त्व फारसें वाटत नसावें. पण न्या. रानडे यांना मात्र तें वाटत असल्यामुळे त्याचाहि समावेश यांत झाला असता तर बरें झालें असतें.

## साहित्य-समीक्षा

**खांडेकर** (चरित्र आणि वाङ्मय)–ले० प्रा. मा. का. देशपांडे, प्रका० स्कूल ॲण्ड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; मूल्य रु. २॥

श्री. अत्रे, प्रा. फडके, श्री. न. चिं. केळकर यांच्यावरील टीकाग्रंथांप्रमाणेच हा ग्रंथहि प्रो. मा. का. देशपांडे यांनी लिहिला आहे. त्यांची कल्पना अशी दिसते की, अिंग्रजींत ज्याप्रमाणे प्रो. सर वॉल्टर रॅले किंवा Men of Letters Series चे अनेक लेखक आहेत त्याप्रमाणे आपलीं पुस्तकेंहि त्या त्या व्यक्तींवरील दीर्घकालीन व्यासंगानंतर लिहिलेले Monographs आहेत; व अशी मान्यता महाराष्ट्रांतील साहित्यिकांनी दिली पाहिजे; न दिल्यास ते दोषाला पात्र ठरतील. पण त्यांनी ज्या घाअीने हा व अितर असले ग्रंथ लिहून टाकले आहेत आणि ज्या अुथळ तुलनात्मक टीकापद्धतीचा अवलंब केला आहे त्यावरूनच त्यांचे 'प्रबंध' हे केवळ शालोपयोगी किंवा महाविद्यालयोपयोगी 'मार्गदर्शक' (guides) किंवा 'सूचिका' (Handbooks) म्हणूनच अुपयोगी पडणारे आहेत. अुत्तरें लिहितांना अुपयोगी पडणारी टिप्पणवजा माहिती त्यांत खच्चून भरलेली आहे. १०० ते १२५ पानें निरनिराळ्या कथा-पटकथा-ललित-निबंध यांचा सारांश देण्यांत खर्ची पडलीं आहेत; शेवटीं प्रा.फडके यांच्याशीं श्री. खांडेकरांची तुलनाहि केलेली आहे. तेव्हा असा हा दीर्घ निबंध परीक्षोपयोगी नक्कीच आहे, आणि 'स्कूल' आणि 'कॉलेजा'साठी अुघडलेल्या 'बुकस्टॉल'ने तो प्रकाशित केला आहे यावरून त्याला दुजोरासुद्धा मिळतो. परंतु वेळीं-अवेळीं परदेशीय ग्रंथकारांच्या नांवांचा दुरुपयोग करण्याची लेखकाची जी 'प्राध्यापकीय' खोड आहे तीमुळे या 'मार्गदर्शिके'चें असलेलें महत्त्वहि कमी होत आहे. "अेका दृष्टीने 'गॉर्कीपेक्षा' खांडेकर श्रेष्ठ दर्जाचे लेखक आहेत असें निःसंशय म्हणतां येईल" (पा. ६६) किंवा "रोमे रोलांच्या 'जॉं ख्रिस्तोफ्'मध्ये जो गोंधळ व व्यक्तींची गर्दी आढळते तसली बजबजपुरी या दोन ('कुलाब्याची दांडी' व 'अुल्का') कादंबऱ्यांत दिसत नाही" (पा. २३२) यांसारख्या ब्रेछूट विधानांनी कांही मोठी अुत्तम 'छाप' जाणत्या वाचकांच्या मनावर तरी पडत नाही; फक्त कॉलेजीय कुमार कुमारिकांपुढे वेळ मारून नेण्याला तीं अुपयोगी पडतात अेवढेंच. प्रा. देशपांडे यांनी असला मोह टाळून जर श्री. खांडेकरांच्या 'गडकरी–व्यक्ति व वाङ्मय' या प्रबंधांतील विचारसरणीचा अधिक खोलपणाने परामर्श घेतला असता तर तें त्यांच्या 'स्कॉलर्शिप'ला भूषणावह झालें असतें. असो. आहे या स्वरूपांत हें पुस्तक श्री. खांडेकरांविषयीची माहिती पुरविणारा साधनग्रंथ म्हणून चालण्यासारखा आहे अेवढें खरें.

ना. ग. जो.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## काव्य

**१ ओळखीचे सूर**– कवि श्री. रा. अ. काळेले; प्रका० श्री. त्रिं. अ. माओणकर, अिमलीबाजार, अिंदूर; मूल्य आ. १२.

**२ प्रेमगीतें**– ले० व प्रका० श्री. शिवराम गोविंद भावे, यादोगोपाळ पेठ, सातारा शहर; मूल्य रु. १.

**३ विशाखा**— कवि श्री. कुसुमाग्रज; प्रका० श्री. वि. स. खांडेकर; खासबाग, कोल्हापूर; मूल्य रु. १।

**४ जीवनदर्शन**– (ले. खलील गिब्रान) अनुवा० श्री. र. ग. जोशी; प्रका० सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य रु. १॥.

**५ श्री केशवस्वामींचो कविता**– संपा० श्री. न. स. जोशी खरशीकरशास्त्री; प्रका० वॅ. श्री. वा. नाओक, बेगमपेठ (हैदराबाद–द.); मूल्य रु. ३.

बहुतेक मासिकांतून श्री. काळेले यांच्या कविता प्रसिद्ध होत असल्याने त्या केव्हाना केव्हा नजरेखालून गेलेल्या असतात. प्रस्तुतचें पुस्तक वाचतांना त्यांतील कांहींची पूर्वीची ओळख पटल्यास नवल कोणतें? 'ओळखीचे सूर' हें नांव या दृष्टीने सार्थ आहे.

श्री. काळेले यांच्या कवितेंत प्रेमभावनेचा खेळकर विलास मोठ्या मनोहरपणें दिग्दर्शित केलेला असतो. संसारांत नित्य घडणारे गोड प्रणयप्रसंग त्यांनी आपल्या कवितेंत संकलित करून ठेविले आहेत. प्रणयाच्या गंभीर भागाचा आविष्कार ते क्वचितच करतांना आढळतात. त्यांच्या वृत्तीचा कल गांभीर्यापेक्षा खेळकरपणाकडे, सखोलतेपेक्षा रम्यतेकडे झुकतो असें दिसतें. 'पूर्णिमा', 'नवा रुमाल', 'तूं गेलीस पण', 'अपुरा शृंगार' हीं आणि यांसारखीं या पुस्तकांतील अितर गीतें वरील म्हणण्याची साक्ष पटवितील. 'तुज म्हणूं कुणासारखी' या गीतांत रा. काळेले यांच्या या वृत्तीचा मधुर विलास दृष्टीस पडतो.

'अभागी अर्भकास' या गीतांतल्या कुमारी मातेच्या मनाची तळमळ करुणपूर्ण आहे. 'मालव कृषिबालेस' हें माळव्याकडील कृषिबालेचें चित्र निःसंशय रेखीव अन् सुंदर अुतरलें आहे.माळव्याकडील वातावरणाचा अुठाव या कवितेंत चांगला झाला आहे.कवितेचा शेवट मात्र विचित्र केला आहे. अशीं रसाळ आणि रेखीव काव्यचित्रें श्री. काळेले अधिक काढतील तर तें त्यांच्या कवितेचें अेक वैशिष्ट्यच ठरेल.

सुनीताला योग्य वृत्त कोणतें याविषयी १९२० ते १९२५ या पांच वर्षांत जी चर्चा झाली त्या चर्चेतून 'प्रेमगीतें' या काव्याचा जन्म झाला. या चर्चेचा निकाल बहुंशीं शार्दूलविक्रीडिताच्याच बाजूने झाला होता, तरी अितरहि वृत्तें शार्दूलविक्रीडितापेक्षा सुनीतरचनेला जास्त अनुकूल आहेत हें सप्रयोग दाखविण्याचा ज्यांनी चंग बांधला त्यांत प्रस्तुत काव्याचे जनक श्री. शि. गो. भावे यांचा समावेश होतो. अंतःसंवेदनेच्या सर्व छटा शार्दूलविक्रीडितापेक्षा मंदाक्रांता वृत्तांतच चांगल्या वठवतां येतात. असा श्री. भावे यांचा दावा आहे. व तो सप्रयोग सिद्ध करण्याकरिता त्यांनी प्रस्तुत काव्य लिहिण्याचा खटाटोप केला आहे. सुनीतरचनेला पोषक वृत्त कोणतें याचा अखेरचा निकाल आता काळाने दिलाच आहे. श्री. भावे यांच्या अभिनिवेशाने मध्यंतरींच्या काळांत पृथ्वी, मालिनी, शिखरिणी अित्यादि वृत्तें, त्याचप्रमाणे भूपतिवैभव, साकी अित्यादि जाति यांचाहि उपयोग सुनीतरचनेकडे कांहीं प्रथितयश कवींनी करून


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पाहिला, नाही असें नाही; पण आता मात्र सुनीत म्हणजे शार्दूलविक्रीडितांत केलेली चौदा ओळींचीच रचना हें अगदी वज्रलेप झालें आहे याबद्दल वाद उरला नाही.

प्रस्तुत काव्य वाचायला घेतांच कै. माधवराव पटवर्धनांच्या अपूर्वरम्य 'विरहतरंगा'ची तीव्र आठवण होते; परंतु त्या काव्याशीं प्रस्तुतच्या काव्याची तुलना करणें म्हणजे या काव्याला अन्याय केल्यासारखें होईल. कारण कै. पटवर्धनांची काव्यात्मता प्रस्तुत कवीजवळ नसल्यानें प्रस्तुतचें काव्य अगदी सामान्य असें उतरलें आहे. अगदी साधें कथानक आणि बऱ्यांपैकी रचना यांमुळे हें काव्य वाचनीय झालें असलें तरी त्यात हृदयंगमता फारच क्वचित् ठिकाणीं प्रत्ययाला येते. नायकाच्या प्रेमाची उत्कटताहि काव्यांत उमटलेली दिसून येत नाही. रचना जितकी सफाईदार करतां येईल तितकी करण्याचा प्रयत्न केल्याचें कवि सांगत असला तरी पैचें बिनघलाऊ जुनें नाणें कवीनें वारंवार वापरलें नसतें तर बरें झालें असतें असें वाटतें.

कवि कुसुमाग्रज यांचा 'विशाखा' हा काव्य संग्रह प्रसिद्ध झाल्यानें काव्य रसिकांना अपरिमित आनंद झाला आहे. कुसुमाग्रजांच्या कवितेंत 'केशवसुतां'चें ओज आणि आवेश, गोविंदाग्रजांचें कल्पनावैभव, बालकवींची काव्यात्मता आणि यशवंतांचें शब्दरचनाचातुर्य हे सारे विशेष एकवटले असले तरी तिचें स्वरूप अगदी पृथगात्म आहे हाच तिचा महनीय विशेष मानला पाहिजे.

'केशवसुतां'नीं भावगीत रचना सुरू केली आणि काव्यांत आत्मनिष्ठतेला साहजिकच महत्व आलें. कारण वैयक्तिक अनुभूति ही भावगीतरचनेचा प्राणच होय. केशवसुतांपासून तों बोरकरांपर्यंत बहुतेक सर्वांनी आत्मनिष्ठ अशीं उत्कृष्ट भावगीतें निर्माण केलीं आहेत यांत शंका नाही; पण या मध्यंतरीच्या काळांत आत्मनिष्ठतेच्या मर्यादा आकुंचित होत होत इतक्या झाल्या की त्या काळांतलीं भावगीतें आपण तपासून पाहूं लागलों तर त्यांत कवींचीं खाजगी सुखदुःखें वावरत असल्याचें आपणांस दिसून येईल. आपल्या सुखदुखांच्या संवेदनांतूनच कवि भावगीतांची स्फूर्ति घेतो हें खरें, पण ह्या संवेदनेचें भावगीतांत रूपांतर होतांना त्यांतील संवेदनेचेंहि वैयक्तिक स्वरूप पालटतें. भावगीतांत वैयक्तिक संवेदना सामान्य स्वरूप धारण करतात; पण जेव्हा आत्यंतिक आत्मनिष्ठता काव्यांत वावरूं लागते तेव्हा भावगीतांचें हें सामान्य स्वरूप नष्ट होऊन तेथे कृत्रिमता आणि रोगटपणाचा प्रादुर्भाव होऊं लागतो. कधी कधी आत्यंतिक आत्मनिष्ठ काव्याला गूढगुंजनाचें स्वरूप प्राप्त होतें. आज मराठी कवितेची कांहींशी अशीच अवस्था झाली आहे. ज्या काळांत भावगीतरचना सुरू झाली व तिचा विकास होत गेला तो काळ व्यक्तिमाहात्म्याचा (Individualism) होता; पण आता पारडें फिरलें आहे. व्यक्तिमाहात्म्याऐवजी समाजमाहात्म्याचें युग आता सुरू आहे. या बदललेल्या परिस्थितीचा प्रभाव जीवनांत आणि वाङ्मयांत सर्वत्र दिसूं लागला असला तरी मराठी कवितेंत मात्र जुनेंच युग सुरू होतें. 'मराठी कवितेला ओहोटी लागली आहे काय?' या प्रश्नावर मध्यंतरीं जीं मतप्रदर्शनें झालीं त्यांत मराठी कवितेने आता आत्यंतिक आत्मनिष्ठेच्या चाकोरींतून बाहेर येऊन समाजाभिमुख व्हायला पाहिजे असा एक सूर होता./ मराठी कवितेने वैयक्तिक सुखदुःखें आळवीत बसण्याचें सोडून समाजाच्या सुखदुःखांची, मानवतेच्या हर्षामर्षाची दखल घेतली पाहिजे. तिने आपली दृष्टि विशाल केल्याशिवाय तिची ही विपन्नावस्था सरणार नाही हें उघड आहे. अर्थात् अशा तऱ्हेचे प्रयत्न मराठी कवितेंत झालेच नव्हते असें नाही, पण ते अगदी त्रुटित होते आणि ते केवळ प्रयत्नच होते हें लक्षांत ठेवलें पाहिजे. कुसुमाग्रजांप्रमाणे ते स्वयंप्रेरणेने झाले नव्हते. कारण मानवी भावनेची सखोल अनुभूति या प्रेरणेच्या

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मुळाशीं नव्हती आणि मानवतेच्या अनुभूतींचा स्पर्श हेंच कुसुमाग्रजांच्या पृथगात्मतेचें मर्म आहे. कुसुमाग्रजांची आत्मनिष्ठता मानवतेच्या सखोल अनुभूतींत लुप्त झाली आहे किंवा त्यांच्या आत्मनिष्ठतेच्या मर्यादा वाढत वाढत जाऊन ती शेवटीं मानवतेच्या मानवेशीं अेकरूप झाली असें म्हटलें तर तें जास्त अचूक ठरेल. ज्या गीतांत आत्मनिष्ठेचा प्रकर्ष व्हावयाला पाहिजे त्या प्रेमगीतांतसुद्धा ही वृत्ति किती जागरूक आहे पाहा :

काढ सखे गळ्यांतील तुझे चांदण्याचे हात । क्षितिजाच्या पलिकडे अुभे दिवसाचे दूत !।। अुरातील आग जगीं । दूत त्याचे लक्षावधी ।। खुजेडांत दिसूं वेडे । आजि ठरूं अपराधी !।।

चांदणें बहरलें आहे, प्रियसखी जवळ आहे, आणि गळ्यांत हात टाकून प्रेमानुनयाचा तिचा लडिवाळ आग्रह सुरू आहे अशा वेळीं कोण म्हणूं धजेल 'काढ सखे गळ्यांतील तुझे चांदण्याचे हात !' अुलट तिच्या बाहुपाशाचा विळखा घट्ट करीत तो म्हणेल दिवसाचे दूतच काय पण प्रत्यक्ष दिवस जरी क्षितिजावर आला तरी त्याला शब्दांच्या सुदर्शनाने झाकून आपण आपला प्रेमानुनय चालू ठेवूं ! पण ज्याला जीवनाचा साक्षात्कार झाला आहे, क्षणोक्षणीं अुग्रतर होणाऱ्या जीवनसंग्रामाची अनुभूति ज्याला येत चालली आहे तो—

वादळीं रणांत । करणें कोठून ।। नाजूक भावांचें । लालन पालन ।।

याशिवाय दुसरें काय म्हणणार ? आणि भोवतालच्या जीवनकलहाची भीषणता पाहतां प्रेमानुभवाबद्दल कवीला—

होतें म्हणूं स्वप्न अेक । अेक रात्र पाहिलेलें ।। होतें म्हणूं वेड अेक । अेक रात्र राहिलेलें ।।

असें वाटल्यास नवल कसलें ? जीवनांत प्रेमाला महत्त्व नाही, असें नाही; नाही तर प्रेमगीत लिहिण्याची मातब्बरी कवीला वाटलीच नसती. ज्या मानवतेचा प्रेम हा अेक रमणीय विलास आहे ती मानवता आज संकटग्रस्त झाली असतांना केवळ प्रेमविलापांतच दंग राहणें हा कृतघ्नपणा होय ! आपल्या कुलाची, राष्ट्राची अब्रु रक्षण करण्याकरिता आपल्या प्रियतमेचा जोहार करून बाहेर पडणाऱ्या रणशूर रजपुतांप्रमाणे आपण या घटकेला वागलों नाहीं तर अपराधी ठरूं ही भावना कवीच्या ठिकाणीं प्रभावी आहे. आणि तसें पाहिलें तर प्रेमपूर्ति होणें हें तरी या वर्गकलहाच्या कालांत कसें शक्य आहे ? कारण,

तूं अुंच गडीं राहसी,...वाळुरणीं ओढीत असे जीस रिक्षा ।

प्रेमनिराशा पदरीं आली तर ती त्याहूनहि वाअीट कारण त्यामुळे जीवन निष्क्रीय होतें—

तरीही केधवा । पडतां पथारी ।। थडगीं दुभंग । होतात अंतरीं ।।
आटवे तुझ्या तें । प्रीतीचें मोहळ ।। आणि हो बिछाना । आगीचा ओहळ !।।

पण कदाचित् प्रेममीलनाचा मंगलप्रसंग आलाच तर त्या प्रसंगींहि कवि आपल्या मीलनाच्या नशेंत झिंगून न जातां तो त्याहि प्रसंगीं जीवनाविषयींच विचार करतांना दिसतो. जीवनाच्या यथार्थ स्वरूपाची समज तो आपल्या सखीला देतांना आढळतो.

जीवित दर्यापरी । नसे तें केवळ सुंदर केवळ भीषण !

आणि या मीलनप्रसंगीं दर्यावरून रात्रीं दिसणाऱ्या नगरांतल्या असंख्य दीपिका पाहतांच कवीला 'असंख्य रत्नांनी भरलेलें ताट अुधळून दिल्याचा भास' होत नाही, तर



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

संसारांतिल समूर्त दुःखें बसलेलीं वा जागत जाळत !

असें त्याला वाटतें.

प्रेमाबद्दलचा अितका अभिनव वास्तववादी दृष्टिकोन मराठी कवितेंत अपूर्वच म्हटला पाहिजे.

जीवनसंग्रामांत फक्त वास्तवालाच स्थान आहे, स्वप्नाळु वृत्तीला नाही. स्वप्नाळु वृत्ति ही पराभूत मनोवृत्तीचें लक्षण समजली पाहिजे. वास्तवाला तोंड द्यावयाचें धैर्य ज्याला होणार नाही तो स्वप्नाळुपणाचा आश्रय घेणार ! क्रांतिप्रवण मनोवृत्ति बनवावयाची असेल तर वास्तवाशीं झुंज दिली पाहिजे. कारण,

वास्तव जगताच्या हेमन्तीं । स्वप्नांचा अुत्फुल्ल फुलोरा ।। ढाळि तळाला वादळवारा ।

म्हणून जुनीं ध्येयें, जुन्या आकांक्षा, जुनीं स्वप्नें हीं या नवीन जगांत भंगणाऱ्या मूर्ती होत. त्यांचा नाश आपण आपल्या हातांनीच केला पाहिजे.

नभिं लागे तारांचें मोहळ । मुलखी त्यांची क्षणिक प्रभावळ ।।
रात्रीचे हें आश्रित केवळ । या मशाल त्यावर धरा जरा ! ।।

मानवतेच्या प्रगतीच्या आड येणारे पाश निर्दयपणानें तोडून टाकले पाहिजेत आणि प्रगतीला पोषक ठरणाऱ्या वास्तवतेचें स्वरूप कितीहि अुग्र असलें तरी तिच्या स्वागतार्थ मन खंबीर केलें पाहिजे. वास्तवतेबद्दलचा हा जिव्हाळा मर्दांनी म्हटला पाहिजे.

जीवनसंग्रामाचें चित्रण कवीने किती परिणामकारी केलें आहे तें पाहण्यासारखें आहे. जीवनसंघर्षांत वीरानुचित भाग घेणाऱ्या आणि केवळ विषमतेमुळे 'धारातीर्थी पतन पावणाऱ्या' प्रातिनिधिक व्यक्तींचीं चित्रें 'लिलाव', 'बळी' 'गुलाम', 'सहानुभूति' अित्यादि कवनांत कवीने जळजळीतपणें काढलीं आहेत. लिलावांत दीन शेतकऱ्याचा सारा संसार जप्त केल्यावर दारीच मुलाला स्तनपान देत बसलेल्या शेतकऱ्याच्या स्त्रीकडे पाहून सावकार जेव्हा म्हणतो :

अूर अुघडे ते तिचे न्याहळूनी
थोर थैलीतिल वाजवीत नाणीं—
" आणि ही रे ! " पुसतसे सावकार
अुडे हास्याचे चहूकडे विखार

तेव्हा कवीने सावकारी मनोवृत्तीवर कमालीचा मर्माघात केला आहे आणि तो किती संयमाने ! 'माळाचें मनोगत' या रूपकात्मक कवितेंत दलितांची दुर्दशा अत्यंत विदारकपणें पुढे मांडली आहे. ज्ञानहीन, सुखहीन, अर्थहीन, आशाहीन दलित-वर्गाला निराशेने माळासारखे

कशास आयुष्य देवा अितुकें
शतकामागून जाती शतकें

असें म्हणावेसें वाटलें तर नवल कसलें ? ही त्याची स्थिति पांच दहा वर्षें का सुरू आहे ? आज युगानुयुगें तो या स्थितींत खितपत पडला आहे आणि पुढे पाचोळ्याचें रूपक घेअून कवि म्हणतो : वाऱ्यानें झाडाच्या तळचा पाचोळा अुडवून नेला तरी—

आणि जागा हो मोकळी तळाशी
पुन्हां पडण्या वरतून पर्णराशी !

पण अशा रीतीने दलितवर्ग नव्हे, प्रत्यक्ष मानवतेला दुःखें, संकटे, गांजणूक अित्यादि शत्रूंनी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

चौफेर वेढलें असलें आणि तिला जर्जर करून सोडलें असलें तरी तिच्या अमोघ सामर्थ्या-बद्दल, तिच्या प्रखर पराक्रमाबद्दल आणि उज्ज्वल भवितव्याबद्दल कवीच्या मनांत रतिभरहि संदेह नाही. अुलट त्याबद्दल दुर्दम्य आशावादच वसत आहे. मानवता आज गरीब, असहाय, केविल-वाणी दिसत असली तरी तिच्या असंतोषाचा ज्वालामुखी अेकदा का भडकला की त्याच्या अुद्रेकांत तिच्या शत्रूंच्या आहुति पानपाचोळ्याप्रमाणे जळून भस्मसात् होतील. 'जमीन व आगगाडी' या रूपकात्मक कवितेंत आपल्या लोखंडी टाचांनी जमीनीला गारद करणारी आणि त्यावरून तिला हिणवणारी आगगाडी शेवटीं तिने भीषण स्वरूप धारण करतांच—

अुलटी पालटी । होअून गाडी ती ॥ हजार शकलें । पडलीं खालती ॥

मानवता आज खवळलेल्या दर्यावर आपली नाव हांकारीत असली तरी तिच्या प्रवासाची काळजी वाहणारा कोणी देवदूत आपल्या मनोऱ्यांत—

किरणांचा अुघडून पिसारा देवदूत कोणी
काळोखावर खोदित बसला तेजाचीं लेणीं

अशी कवीची खात्री आहे. ती आज जरी परवशतेने आणि पिळणुकीने गांजली असली आणि तिच्या विमोचनार्थ आपल्या प्राणांची कुरवंडी करणारे तिचे सुपुत्र अन्नत्याग करून मरणाच्या दारांत अुभे असले तरी—

'सरणावरती आज आमुचीं पेटतांच प्रेतें
अुठतिल त्या ज्वालांतुन भावी क्रांतीचे नेते
लोहदंड तव पायांमधले खळखळा तुटणार
आअी, खळाखळा तुटणार

असा कवीचा जिवट विश्वास आहे. आणि म्हणून जालियनवाला बागेंतील प्रसंग म्हणजे येशूच्या काळजांतील जखम असेच कवि त्याचें वर्णन करतो.

[या सर्व गीतांतून ओज, आवेश, चीड, त्वेष ओसंडून बाहेर पडत आहेत; किंबहुना ते तसे ओसंडत नसते तर कवीला सांगावयाच्या गोष्टी लटक्या तकलादी वाटल्या असत्या आतापर्यंत जिचें स्पष्टीकरण केलें ती कवीची भूमिकाच अशी आहे की, तिची सांगता ओज, आवेश, चीड आणि त्वेष याशिवाय होणेंच नाही. कवीच्या ठिकाणीं कोमल भाव नाहीत असें नाही, पण त्याच्या प्रतिभेचा विशेष तेजस्विता हाच आहे. आणि त्याला प्रतीत होणारें जीवन हेंच जेथें संग्राममय आहे तेथे कोमल मनोवृत्तींच्या विलासाला अवकाश तरी कोठें असणार ? संग्राम म्हटला की तेथे जाळपोळ, रक्तपात, प्राणघात हीं संभवणारच. म्हणूनच कोमलतेपेक्षा अुग्रतेकडे, संयमपणापेक्षा अुधाणाकडे, थंडपणापेक्षा प्रखरतेकडे कवि जास्त झुकल्याचें दिसतें. जीवनाची भयानक बाजूच कवीला दिसतें आहे तर कवि तिचे ललित-मधुर वर्णन कसें करणार ? अुलट असें अुग्रभीषण प्रसंग आले की कवीच्या प्रतिभेला अुधाण येतें. अुग्रतेचा-गंभीरतेचा विलक्षण आविष्कार या कवी अितका दुसरा कुणीच केला नसेल. अुग्रतेची रेखीव वर्णनें 'विशाखे'त कितीतरी विखुरलीं आहेत अुदाहरणार्थ हिमलाटेचें वर्णन पाहा :

मुखिं पिळून मद्यास्तव द्राक्षांचे घोस
पाडीत मळे मोत्याचे चरणीं ओस
अुद्दाम धावते करीत दुभंग धरेस
करकरां रगडी पाखरें दांताखाली

जपान्यांच्या लिली पाहा :

आर्त धावा आओीचा अैकुनी धावे अर्भक, ना जुमानी बंदुक
आणि लेंवे सांगिनीला छान छोटें आतडें, जा जरा पूर्वेकडे

तसेंच सापाचें हें वर्णन किती मासलेवाओीक !

वा ताण्डव करता सोम प्राशुनी काली
रक्तांत नाहली, शिरमुंडावल माली
थयथया नाचतां नरड्यावर प्रेताच्या
हें कंकण निखळुनि पडलें भूवर खाली

या आपल्या वैशिष्ट्याची जाणीव कवीला नाही असे थोडेंच आहे ? आपल्या काव्य-शक्तीचें सामर्थ्य कवि पूर्णपणें ओळखून आहे. स्वतःबद्दल अवास्तव कल्पना कवीने मुळींच बाळगल्या नाहीत. लालित्याचे अन् माधुर्याचे फुलोरे फुलवणें हें आपलें कार्य नव्हे हें तो जाणून आहे. म्हणूनच 'कुस्करूं नका हीं सुमनें', 'पहा अुघडिलें हृदयाला आंत सुखें घाला माला', किंवा 'पिकलें फळ हें तुझियासाठीं खुपस आपली चोंच' अशा नाजुक तक्रारी तो करतांना आढळत नाही तर आपल्या कवितेची यथार्थ कल्पना देतांना म्हणतो:

खडकाळ प्रांत तो ही जेथून निघाली,
पथ शोधित आली रानांतून अकेली
नच रम्य राअुळें, कलापूर्ण वा घाट
अंकुरती तुरळक परि तीरावर वेली !

येवढ्यावरून नीट कल्पना येणार नाही म्हणून कवि पुढे म्हणतो की तिचें सामर्थ्य तिच्या 'रूक्ष'पणांत केवळ नसून रूक्षपणामुळे तिच्या ठिकाणीं आलेल्या ज्वालाग्राहित्वांत आहे. कवि आपल्या कवितेचें साम्य फळ, फूल, चांदणें अित्यादि रमणीय आणि सुखद वस्तूंशीं दाखवीत नसून तिला रूक्ष ज्वालाग्राही समिधा म्हणत आहे.

समिधाच सख्या या, त्यांत कसा ओलावा,
कोठून फुलांपरि वा मकरंद मिळावा ?
जात्याच रूक्ष या, येकच त्या आकांक्षा,
तव आंतर अग्नी क्षणभर तरि फुलवावा !

अितक्या विवेचनानंतर हा कवि प्रचारक तर नाहींना अन् आपल्या कवितांतून तो विशिष्ट तत्त्वज्ञानाचा प्रचार तर करीत नसावा ना अशी शंका अुपस्थित होण्यासारखी आहे. त्याला अुत्तर देणें कठीण नाही. कुसुमाग्रजांच्या काव्यामागे अेक विशिष्ट तात्विक भूमिका आहे हें कोणालाहि अमान्य करतां येणार नाहीं; नव्हे, हा त्यांच्या काव्याचा अेक महनीय विशेष आहे. आधुनिक मराठी कवींत ज्यांच्या काव्यामागे अेक विशिष्ट सुसंगत तात्विक भूमिका आहे असे कवि बोटांवर मोजण्याअितके सापडतील कीं नाही याची शंका आहे. पण कुसुमाग्रजांची ही तात्विक भूमिका सखोल अनुभूतींतून जन्म पावली आहे आणि त्यांच्या ठिकाणीं वसत असलेली काव्यात्मता ही तितकीच विपुल आणि संपन्न अशी आहे. सुसंगत तात्विक भूमिका, सखोल अनुभूति आणि संपन्न काव्यात्मता या तीन महनीय विशेषांचा प्रीतिसंगम कुसुमाग्रजांच्या काव्यांत झाल्याने त्यांच्या काव्याला अुत्कटता, सखोलता आणि विशालता प्राप्त झाली आहे. सामाजिक मनाचा तेजस्वी अुन्मेष या कवितांतून पाहावयास सापडतो. 'तुतारी' या काव्यांत



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

केशवसुतांची जी मनोवृत्ति दिसून येते तिचा अुदात्तरम्य प्रकर्ष कुसुमाग्रजांच्या काव्यांत झालेला आढळतो.

**ना. मा. सं.**

सीरियाचा महाकवि खलील गिब्रान याच्या Prophet नामक श्रेष्ठ ग्रंथाचा अनुवाद मराठींत यापूर्वीच व्हावयास पाहिजे होता. गुजराथींत 'विदाय वेळाअे' आणि हिंदींत 'जीवन-संदेश' हे त्याचे अनुवाद प्रसिद्ध झाले असून ते त्या त्या भाषेतील सुंदर लेणें म्हणून मानले गेले आहेत. मराठीमधील हा अनुवादहि भाषाशैली आणि विचारांची अभिव्यक्ति या दोन्ही दृष्टींनी तितकाच चांगला झाला आहे. श्री. जोशी हे स्वतः कवि आहेत, स्वतःच्या कविता ते 'लोकशिक्षणां'त, 'पद्मविहारी' नांवाने देत असत. तेव्हा Prophet मधील काव्य आत्मसात् व्हावयास ते सर्वतोपरि योग्यच होते. शिवाय गांधीवादी विचारसरणीशीं ते तादात्म्य पावलेले असल्यामुळे आंतील विचारांची प्रणालिका समजून घेअून त्याची अभिव्यक्ति करावयासहि ते लायक होते; यामुळे अनुवादाचें कार्य त्यांनी अुत्तम तऱ्हेने पार पाडलें आहे.

गिब्रान हा द्रष्टा होता. तो साक्षात्कारी लेखक असून आध्यात्मिक बैठकीवरूनच त्याचें सर्व लिखाण झालेलें आहे; पण तो अन्तःकरणाचा कवि होता. सिद्धान्त तार्किक पद्धतीने मांडून दाखविणारा तर्कवादी तत्त्वज्ञ नव्हता. त्यामुळे त्याच्या मनाला जीवनाच्या निरनिराळ्या पैलूंचें जें आकलन झालें तें विशेषतः भावनेच्या–श्रद्धेच्या–योगाने झालें. अशा रीतीने गूढवादी वाटणाऱ्या लेखकाच्या विस्कळित प्रकारें लिहिलेल्या भावगम्य लेखनांतील अन्तर्गत अेकरूपता ध्यानांत येणें सोपें काम नव्हे. तें अवघड काम सोपें करण्याचें कार्य आचार्य भागवतांच्या नितान्तसुंदर 'दर्शनपरिचया'ने केलें आहे. आचार्य भागवत स्वतः अेक समर्थ साक्षात्कारवादी विचारक आहेत. समग्र जीवनाचें त्यांचें सम्यग्दर्शन आणि गिब्रानचें 'जीवनदर्शन' हीं बहुतांशाने जुळतीं होतीं. त्यामुळेच ज्या ज्या ठिकाणीं गिब्रानचा गूढवाद कळणें कठीण जाण्याचा संभव होता त्या त्या ठिकाणीं आचार्य भागवतांनी त्यांतील सूक्ष्म अनुबन्ध विशद करून दाखविला आहे; व असें करतांना स्वर्गस्थ रवीन्द्रनाथ व कै. केशवसुत यांच्या काव्याचाहि अुपयोग केला आहे. कांही ठिकाणीं शुद्ध गांधीवादी विचारसरणी व 'जीवनदर्शन' यांमधील मतभेद-स्थळें दाखविलीं असून हें सर्व ज्या पद्धतीने केलें आहे ती तात्त्विक रसग्रहणाची पद्धति मराठींत तरी अनुपम आहे.

परिशिष्टांत गिब्रानच्या अितर ग्रंथांतील निवडक अुतारेहि दिलेले आहेत त्यामुळे गिब्रानच्या लेखनशैलीची यथातथ्य माहिती होण्यास मदत होते. यावरोबरच Garden of the Prophet चाहि समावेश संपूर्णपणें झाला असता तर अधिक बरें झालें असतें. कारण 'जीवनदर्शना'च्या दृष्टीने Prophet ला सर्वांत अधिक मान मिळत असला तरी जीवनकाव्याच्या दृष्टीने Garden हेंच अधिक अुत्कट वाटतें. शिवाय विचारांच्या दृष्टीनेहि तें prophet चें पूरकच आहे. पुस्तकाच्या नांवासंबंधांतहि थोडासा मतभेद होणें संभवनीय आहे. नांव अन्वर्थक आहेच; पण मूळ नांव बदलून अनुवादांत दुसरें नांव घालणें यांत फारसा अतिप्रसंग होतो असें वाटतें. prophet या नांवाचाहि अनुवाद करून 'प्रेषित', 'पैगंबर', 'भविष्यवेत्ता', 'द्रष्टा' यापैकी किंवा असेंच दुसरें नांव शीर्षक म्हणून देतां आलें असतें. मूळ नांव अन्वर्थक न वाटल्यास पोटमथळा म्हणून दुसरें नांव द्यावें. रस्किनच्या *Unto This Last* संबंधांत असें म्हणतां

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

येईल, पण खलील गिब्रानच्या 'प्रेषिता'च्या बाबतींत तीहि अडचण दिसत नाही. अनुवादकांची या गोष्टीकडेहि जरा अधिक चिकित्सेने पाहावें असें मला वाटतें.

श्रीसमर्थ रामदासांच्या 'पंचायतनां'तील भागानगरकर 'श्री. केशवस्वामी यांच्या कविता'चा संग्रह संतवाङ्मयाच्या अभ्यासकांना आणि रसिकाना आनंद देअील असा आहे. सगळेच संत आपापल्यापरी मोठे आहेत, तरीहि त्यांतील कांहींना साहित्याच्या दृष्टीने जसें विशेष मानले जाते त्याच पद्धतीला अनुसरून विचार करतां असें वाटतें की संत म्हणून वंद्य असलेल्या श्री केशवस्वामींची कविता 'काव्यगुणां'च्या दृष्टीने मात्र दुय्यम प्रतीची आहे. तींतील स्फूट श्लोकांत समर्थांच्या 'करुणाष्टकां'तील आर्तता नाही; अभंगांत तुकारामाचा जिव्हाळा नाही; पद्यांत अेकनाथांच्या पद्यांतील भावरम्यता नाही किंवा हिंदी कवनांत मीराबाई कबीर यांच्या भजनांतील आळवणी नाही. त्यांतल्या त्यांत कृष्णपर आणि हिंदी कवनांतील पद्यें मधून मधून गोड वाटतात. अर्थात् वरील अुचनीचता अुत्कटतेच्या प्रमाणांतच आहे. भक्तिभावाचा अुमाळा नाही असें अर्थात्च व्हावयाचें नाही; पण त्याचें स्वरूप येथे अधिक वेदान्ती–निवृत्तिपर असल्यामुळे आणि अेकसुरीपणा व पुनरुक्तिहि बरीचशी असल्यामुळे या कविता निवडूनच वाचाव्या लागतात. मात्र संपादक व प्रकाशक यांनी जे श्रम घेतले आहेत त्याबद्दल ते धन्यवादास पात्र आहेत.

ना. ग. जो.

## इतिहास–राज्यशास्त्र

**१ श्री प्रतापशस्त्रागार**— ले० राजरत्न प्रो. माणिकराव; प्रका० मे. रा. रा. द. वि. गायकवाड, खाजगी कारभारी, खाजगी कचेरी, बडोदें, मूल्य रु. १॥=.

**२ पाकिस्तानचें संकट**—ले० व प्रका० श्री. शि. ल. करंदीकर, ३९९ सदाशिव, पुणें २; मूल्य रु. २.

**३ पाकिस्तान कीं पन्नास टक्के**—ले० श्री. प्रभाकर पाध्ये, प्रका० डॉ. मा. भै. अुदगांवकर, हिंदु कॉलनी, दादर; मूल्य रु. १.

श्रीमंत सरकार सर प्रतापसिंह महाराज गायकवाड यांच्या शस्त्रागारांत संख्येने सुमारें १२०० व किमतीने लक्षावधि रुपयांच्या मूल्याचीं अशीं जीं शस्त्रें आहेत त्यांची परीक्षा, वर्गवारी, नोंद व सुव्यवस्था करण्याचें काम राजरत्न प्रो. माणिकराव या तज्ज्ञांकडे सोपविण्यांत आलें होतें. हीं सर्व दुर्मिळ आणि मूल्यवान् शस्त्रें आता 'श्री प्रतापशस्त्रागार' या नांवाच्या प्रशस्त शस्त्रसंग्रहालयांत ता. १८ मार्च १९४१ पासून सुप्रतिष्ठित करण्यांत आलीं. त्या निमित्ताने प्रस्तुत शस्त्रवर्णनात्मक ग्रंथ राजरत्न माणिकरावांच्या लेखणींतून अुतरलेला आहे. ग्रंथांत शस्त्रागारांत लावलेल्या हत्यारांचीं अनेक सुबक छायाचित्रें नांवनिशीवार दिलेलीं असल्यामुळे शस्त्रदर्शनाची हौस अंशतः घरबसल्या फिटते व अभ्यासाची सोय होते. छायाचित्रावरील झिरझिरीत वेष्टनावरहि छापलेलीं विविध ग्रंथांतील अवतरणें, प्रत्येक परिच्छेदाला दिलेले मथळे, प्रयत्नपूर्वक संकलित केलेली परिशिष्टांतील विविध माहिती, सुंदर छपाअी आणि मुठींचीं वगैरे तयार करून छापलेलीं चित्रें ह्या सर्व गोष्टी प्रो. माणिकरावांच्या सायासांची ग्वाही देतात. हा ग्रंथ तयार करतांना लेखकाने शस्त्राचीं नवीं व जुनीं पुस्तकें वाचल्याचें या ग्रंथांत नमूद आहे (पृ. ८४). पैकी प्रसंगाने कांहींचा ओझरता अुल्लेखहि आलेला आहे (पृ. १४, ७४, ७६, ८१, ८४,

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

१०). सर्वांबद्दल थोडीशी माहिती या अन्य विविध तपशिलाने भरलेल्या ग्रंथांत आली असती तर वाचकांना खास आवडली असती. ती सर्व याच विषयावर जो दुसरा ग्रंथ लिहिण्याचें अभिवचन लेखकाने दिलें आहे त्यांत यावी अशीच वाचकांची अपेक्षा असणार. आणखी अेक गोष्ट. कृतज्ञतेचे दोन बोल आणि प्रास्ताविक विवेचन वाहि प्रकरणांची अगदी परिच्छेदवार अनुक्रमणिका देणाऱ्या पुस्तकांत प्रत्येक हत्याराच्या वर्णनाचें संदर्भपृष्ठ देणारी सूची समाधानकारक नसावी हें अभ्यासाच्या दृष्टीने फार मोठें वैगुण्य राहिलेलें आहे. परिशिष्ट १० ची रचना अक्षर-विल्हे बरोबर दिसत नाही. त्यांत आलेल्या कांही नांवांची वर्णनें ग्रंथांत शोधून काढतां येत नाहीत.

श्री. शि. ल. करंदीकर ह्यांच्या व्यक्तिमत्त्वपूर्ण कर्तृत्वाचा ठसा, विशेषतः त्यांचें 'त्रिकाळ' वृत्तपत्र आणि मुंबअी कौन्सिलांतील कामगिरी यांमुळे, महाराष्ट्रियांच्या अंतःकरणावर कायमचा अुमटलेला आहे. मध्यंतरींच्या त्यांच्या बहुधा स्वयंस्फूर्त विश्रांतीनंतर आता त्यांनी अधिक चिरस्थायी अशा स्वतंत्र व अभ्यासपूर्ण ग्रंथकर्तृत्वाच्या क्षेत्रांत पदार्पण केलें आहे. पहिलें पाअूल या दृष्टीने 'पाकिस्तानचें संकट' हें त्यांचें पुस्तक जितकें त्यांच्या राजकीय-तत्त्वज्ञानाला साजेसें आहे, तितकेंच अगदी प्रसंगाला अुचित असेंच आहे. जगामध्ये महायुद्धाने कितीहि खळबळ अुडविली असली तरी त्या खळबळींत हिंदुस्थानच्या राजकारणांतील या जिव्हा-ळ्याच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष करून चालावयाचें नाही हाच अत्यंत महत्त्वाचा संदेश या पुस्तकांत असल्याने प्रत्येक हिंदूला हें पुस्तक संग्राह्य आणि अभ्यसनीय असेंच झालेलें आहे. वृत्तपत्रव्यव-सायांत कसलेली ओघवती लेखणी, चालू राजकारणांतील अिलाखा-केन्द्रस्थानीं भाग घेण्याची संधि मिळाल्यामुळे बुद्धीला आलेली अेक प्रकारची धार, सार्वजनिक कार्याची धुरा बराच वेळ वाहिल्यामुळे प्राप्त झालेली भेदक दृष्टि, आणि बहुसंख्य लोकांच्या 'दुनिया झुकती है' अशा प्रकारच्या कांहीशा बेजबाबदार आणि अदूरदर्शी राजकारणाबद्दलचें महाराष्ट्रियाच्या खऱ्या चिकित्सक दृष्टीला वाटणारें तीव्र असमाधान, या सर्वांचें या बहुधा संयमाने लिहिलेल्या ग्रंथांत बेतशीर निदर्शन झालेलें आहे. मात्र तपशीलवार म्हणजे विषयपरिष्कार करणाऱ्या विस्तृत अशा अनुक्रमणिकेच्या व शेवटीं संदर्भ-दर्शक सूचीच्या अभावीं, या पुस्तकाची कांही बाबतींत त्वरा-संदर्भग्रंथ म्हणून अुपयोग करण्याची जी वास्तविक पात्रता आहे तिचा लाभ ग्राहकाला घेतां येणें कठीण होअून बसणार आहे. अनेक चांगले ग्रंथकार अशा अेक दोन गोष्टींसाठी कराव्या लागणाऱ्या परिश्रमांची निष्कारण काटकसर करतात. परंतु त्यामुळे त्यांच्या ग्रंथांचा अुपयोग सुलभपणें आणि हरघडी करण्याच्या कामीं अडचणी अुत्पन्न होतात. ही गोष्ट लोकांना कंटाळवाणी होअीपर्यंत देखील पुनः पुनः ग्रंथकारांच्या नजरेस आणल्याशिवाय गत्यंतर नाही असें झालें आहे.

प्रस्तुत २४० पृष्ठांच्या पुस्तकाचीं अेकूण १३ प्रकरणें आहेत. अनवधानाने, भोळसट-पणाने वा दूरवर परिणामांकडे लक्ष न देतां समतोलपणाचा आविर्भाव आणून पाकिस्तानबद्दल ज्या अनैतिहासिक, अन्याय्य व अशास्त्रीय कल्पनांचा प्रचार, प्रसार आणि स्वीकार केला जातो त्यांचा खरपूस समाचार या पुस्तकांत घेतला गेला आहे. या पुस्तकाचे साधारणतः पांच भाग पडतात. पहिलीं दोन प्रकरणें — पहिला भाग — पाकिस्तान हा शब्द कसा आला, त्यामध्ये कल्पनाविष्कार अुद्धटपणा व धर्मकारणाचा दर्प कसा आहे आणि मुसलमानांचें हिंदुस्थानांतील महत्त्वाचें वाट-णारें स्थान हें 'दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा' असल्या गाफील वचनांनी देखील कसें समर्थनीय ठरण्यासारखें नाही, हें आवेशाने मांडणारीं अशीं आहेत. दुसरा भाग तीन प्रकरणांचा आहे. त्यांत १८५७-१८९२, १८९२-१९२० आणि १९२०-१९४१ अशा तीन टप्प्यांत मुस-

लमानांच्या मागण्या कसकशा क्रमाक्रमाने वाढत चालल्या आहेत याचें मोठें मार्मिक विवेचन केलें आहे. ब्रिटिश मुत्सद्यांनी निरनिराळीं आमिषें दाखवून देशांतील राष्ट्रसभा आदि करून राष्ट्रीय चळवळींपासून मुसलमानांना प्रथम कसें अलिप्त ठेवलें व नंतर दुहीचें बीज पेरून त्यांना कसें चिथावून दिलें याचें स्पष्टीकरण करून, कांगावखोर सरकारच्या कावेबाज आहारीं जाऊन हिंदु-मुसलमानांच्या वांझोट्या अैक्याचा ध्यास लागल्यामुळे कॉंग्रेसनेच त्यांना कसें लाडावून ठेवलें व जीनांचा भस्मासूर जन्माला घातला याबद्दल सडेतोड अितिहास निवेदन केला आहे. हल्लीच्या ब्रिटिश सरकारनिर्मित व कसे तरी बनलेल्या प्रांतांची भाषाधर्मादि दृष्टींनी कशी विन-सूत्र मांडणी झालेली आहे हें सांगण्यासाठी अेक व मुसलमानांनी आपआपल्या मताप्रमाणें मांडलेल्या पाकिस्तानच्या अेकापेक्षा अेक विक्षिप्त व भयंकर योजनांचें दिग्दर्शन करण्यासाठी अेक अशीं दोन प्रकरणें– पुस्तकाचा तिसरा भाग –पुढील विवेचनाला पार्श्वभूमीदाखल आवश्यक अशा माहितीचें संकलन करण्यासाठी लिहिलेलीं असून त्यांतील, विशेषतः दुसऱ्या प्रकरणांतील माहिती बऱ्याच जणांच्या नेहमीच ध्यानांत नसते अशी आहे.

डॉ. आंबेडकरांचा 'थॉट्स् ऑन् पाकिस्तान' हा ग्रंथ त्यांतील अधिकृत माहितीमुळे आणि बहुतेक प्रकरणांतील मूलग्राही विचारसरणीमुळे या विषयावरील ग्रंथराजच होय. या ग्रंथांतून अनेक अुतारे व आंकडे विपुलपणें दाखल करून प्रस्तुत ग्रंथकर्त्यानेहि त्याचें महत्त्व शब्दानें व कृतीनेहि मान्य केलेलें आहे. परंतु डॉ. आंबेडकरांनी पुरस्कृत केलेला द्विराष्ट्रवाद आणि त्याच्या आधारावर त्यांनी केलेलें पाकिस्तानमान्यतेचें समर्थन कट्टर हिंदुत्वनिष्ठांच्या दृष्टीने कसें अग्राह्य आहे याचें युक्तिवादपूर्ण पृथक्करण श्री. करंदीकरांनी चौथ्या भागांत म्हणजे प्रकरणें ८, ९ व १० यांमध्ये केलेलें आहे. पांचव्या भागांतील म्हणजे शेवटच्या तीन प्रकरणांतील विवेचन हिंदुसभेची या प्रश्नाबद्दलची भूमिका स्पष्टपणें समजण्याला अत्यंत अुपयोगी पडणारें आहे. यामध्ये मुसलमान साम्राज्याचा हृदयपालट झालाच आणि आजपर्यंत हिन्दुसमाजावरील केलेले अत्याचारांची भरपाअी करण्याची त्यांना न्याय्य सद्बुद्धि झालीच तर हिंदुसमाज त्यांच्याकडून कशाची अपेक्षा करील, याची मोठी मनोरंजक 'मीमांसा केलेली आहे. 'कॉंग्रेसच्या राजकारणाची अितिश्री' या प्रकरणांत कॉंग्रेसची नित्याची धरसोड वर्णन करून हिंदुराष्ट्राच्या संरक्षणाला ती कशी कार्यक्षम नाही याची फोड करून दाखविली आहे. आणि शेवटीं 'हिंदुसंघटनेचा महामंत्र' हें चिंतनीय प्रकरण कळसाध्याय म्हणून लिहिलें आहे.

प्रस्तुत पुस्तकांतील विवेचन स्वाभाविकपणेंच बरेंचसें अितर ग्रंथांतील अुताऱ्यांवर आधारलेलें असलें, तथापि त्यामधून मौ. अझादसारख्यांचा खरा दृष्टिकोन, महात्मा गांधींचे हिंदुहिताबद्दलचे विचार वगैरेंवर कांहीं विलक्षण प्रकाश पडतो. माहितीच्या दृष्टीने जीनांचे १४ मुद्दे वगैरे नेहमीं बोलण्यांत येणाऱ्या परंतु क्वचितच हाताशीं सांपडणाऱ्या गोष्टींचा समावेश करण्याने थोडी अधिक पूर्णता आली असती असें वाटतें. भाषा, विचारांची मांडणी या दृष्टीने पुस्तक बहुतांशीं निर्दोष असून लेखकाशीं सहमत असणाऱ्या वाचकांना संदर्भासाठी संग्राह्य वाटण्याअितपत खास आकर्षक आहे.

'पाकिस्तान कीं पन्नास टक्के'. श्री. प्रभाकर पाध्ये या आधुनिकतावादी व 'निर्भेळ बुद्धिवादी' राज्यशास्त्रनिरीक्षकाने लिहिलेलें हें छोटेखानी पुस्तक– वेळोवेळीं धनुर्धारी साप्ताहिकांत प्रसिद्ध झालेल्या दहा लेखांचें पुनर्मुद्रण— डॉ. अुदगांवकर या हिंदुमहासभावाल्याने प्रसिद्ध

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

केलेलें आहे अेवढें सांगितलें म्हणजे या पुस्तकाचा कटाक्ष सर्वस्वी मुस्लीमपुरस्कृत धुर्मट पाकिस्तानवादाच्या विरुद्ध आहे, हें न सांगतांहि समजण्यासारखें आहे. परंतु डॉ. आंबेडकर यांनी सारासार विचार करून, आणि त्यांत हिंदूंचें खरें हित आहे असें आर्थिक व व्यावहारिक अशीं अनेक प्रमाणें मांडून, ज्या द्विराष्ट्रवादाऱ्यावर आधारलेल्या शास्त्रीय (?) पाकिस्तानाचा पाठपुरावा केला आहे, त्याहि पाकिस्तानाला श्री. प्रभाकर पाध्ये यांचा कसून विरोध आहे हें ध्यानांत घेतलें पाहिजे. डॉ. आंबेडकरांचीं द्विराष्ट्रवादादि गृहीत कृत्यें त्यांना मान्य नाहींत. मर्यादित पाकिस्तान दिल्याने तर खरा हिंदुमुसलमानांच्या तेढीचा प्रश्न सुटणारच नाही, कारण पन्नास वर्षांच्या अनुभवावरून सर्व हिंदुस्थानाचें पाकिस्तान केल्याशिवाय मुसलमानांच्या भरमसाट मागण्या थांबणार नाहीत, डॉ. आंबेडकर म्हणतात ते सर्व फायदे तितके निश्चितपणें पदरांत पडतीलच असे किंवा अगदी निर्णायक स्वरूपाचे अेस नाहीत, असें प्रतिपादन श्री.पाध्ये यांनी केलें आहे. डॉ.आंबेडकर यांच्या विद्वत्ताप्रचुर सिद्धान्तांतील दोषस्थळें खऱ्या बुद्धिवादाच्या व बहुतांशीं निःपक्षपाताच्या भूमिकेवरून दाखवून प्रस्तुतच्या वादांत त्यांनी खरोखर भर घातलेली आहे. श्री.पाध्ये यांनी बहुतांशीं आधींच विश्रुत असलेल्या माहितीचा अुपयोग केला असणें अपरिहार्यच होतें. तथापि त्या सर्व ज्ञात गोष्टींची तर्कशुद्ध मांडणी करून तीवरूनच मुस्लिम लीगचें तंत्र व नात्सी-प्रेरित सुडेटन जर्मनांचें तंत्र यांमधील निकटचें साम्य दर्शवून जीनांची पाकिस्तानाची मागणी म्हणजे शुद्ध पन्नास टक्के प्रतिनिधित्व मिळविण्याकरिता टाकलेला डाव आहे, ही गोष्ट सूर्य-प्रकाशाअितकी स्पष्ट केली आहे. आणि त्याचाच पुढचा भाग म्हणून त्यांनी दिलेला अिशाराहि मननीय आहे. पाकिस्तानाला विरोध करणारे प्रामाणिकपणेंच कां होअीना, परंतु त्याबद्दल अमर्याद भीति निर्माण करून, तिची प्रतिक्रिया म्हणून—पाकिस्तान नको, वाटेल तर मागतां तितकें भरमसाट प्रतिनिधित्वहि देतों, असें म्हणावयास तयार होतील, तसें त्यांनी अधीरपणें कांही करूं नये असें त्यांचें निक्षून सांगणें आहे. आता पाकिस्तान मान्य करावयाचें नाही तर मग काय करावयाचें याचाहि त्यांनी विचार केला आहे. त्यांत हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळाल्या-नंतर हा प्रश्न सुटणारा आहे, असें प्रतिपादन करून हिंदुस्थानांत तत्पूर्वीहि आधुनिकतावादी प्रवृत्तींचा परिपोष केळा पाहिजे अित्यादि आशावादी विवेचन केलें आहे. तथापि या सर्व वादांचा योग्य निकाल करण्याची गुरुकिल्ली ब्रिटिश सरकारच्याच हातांत आहे हा सर्वमान्य होणारा विचारहि त्यांनी सामर्थ्याने मांडला आहे. अशा रीतीने प्रासंगिक राजकीय प्रश्नाचा शास्त्रशुद्ध आणि सांगोपांग विचार करणाऱ्या अुद्बोधक लेखांची प्रथा नव्याने पाडणाऱ्या श्री. प्रभाकर पाध्ये यांच्या कर्तव्यबुद्धीचें कौतुक करावें तेवढें थोडेंच आहे. असली प्रथा यशस्वी करण्या-अितका साक्षेप, बुद्धिसामर्थ्य आणि प्रत्युत्पन्नमतित्व तर त्यांच्याजवळ आहेच; पण त्याहूनहि आकर्षक आणि खात्री पटविणारी अशी लेखनशैलीहि त्यांनी आत्मसात् केलेली आहे. छोट्याशा कक्षेंत मूल्याही व वाचलें तर आपल्या ज्ञानांत नवी कांही भर पडली असें वाटावयास लावणारें व मोठ्या गुंतागुंतीच्या प्रश्नाचें कोडें अुलगडण्यास अनाग्रही बुद्धिने साहाय्य करणारें हें छोटें पुस्तक लिहिल्याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें अिष्ट आहे. कारण मागे मीं अेके ठिकाणीं लिहि-ल्याप्रमाणे प्रचलित प्रश्नांवर सांगोपांग ज्ञान फैलावण्याच्या दृष्टीने असलीं छोटीं पुस्तकें जितकीं कार्यक्षम ठरतात तितके मोठे ग्रंथहि ठरत नाहीत. तेव्हा निरनिराळ्या प्रचलित महत्त्वाच्या प्रश्नांवरील लघुग्रंथांची प्रथा वाढेल तितकी अवश्य वाढविली पाहिजे. त्या दृष्टीने या पुस्तकाचें स्वागत करावेंसें वाटतें. पण असलीं पुस्तकें यशस्वी व्हावयाचीं तर बहुसंख्येने वाचलीं गेलीं पाहिजेत. आणि त्यासाठीं त्यांची किंमतहि थोडी कमी ठेवावी लागेल. दि. वि. का.

म. सा. प. (१५-३-४०)

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## कथा-कादंबरी

१ **समरांगण**—ले० श्री. म. मा. भोसले; प्रका० श्री. दा. ना. मोघे, स्कूल ॲन्ड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; मूल्य रु. १॥.

२ **तीन तरुणी**—ले० श्री. व्यं. अ. पै रायकर; प्रका० श्री. बा. द. सातोस्कर, सागरसाहित्य, त्रिभुवनरोड, मुंबआी नं. ४; मूल्य रु. २॥।.

३ **धुकें आणि दहिंवर**—ले० गीता साने; प्रका० कु. कुमुद कुलकर्णी, अरुण साहित्य, रामबाग, मालाड (मुंबअी); मूल्य रु १.

४ **तृष्णा**—ले० नलिनी मुळगांवकर; प्रका० श्री. बा. द. सातोस्कर, सागरसाहित्य, त्रिभुवनरोड, मुंबअी ४; मूल्य १।.

५ **जिवाची मर्दुमकी**—ले० प्रा. वि. मा. दी. पटवर्धन; प्रका० श्री. रा. का. तटणीस, ३६४ ठाकुरद्वार, मुंबअी २;, मूल्य रु. २.

६ **रात्रीचा दिवस**—ले० श्री. बा. सी. मर्ढेकर; प्रका० श्री. वि. ना. दीक्षित, अींटर नॅशनल बुक सर्व्हिस, पुणें ४; मूल्य रु. १॥।.

खेडेगांवातील सावकारी पद्धतीचें भेसूर स्वरूप दाखविणारी 'समरांगण' ही अेक वाचनीय कादंबरी आहे. लेखकास खेडेगांवच्या जीवनाचा प्रत्यक्ष परिचय असल्याने त्याला कथानकांत सहज जिव्हाळा अुत्पन्न करता आला आहे. प्रत्येक पात्राने आपापली हकीगत सांगावी या आत्म निवेदनपद्धतीने ही कादंबरी लिहिली आहे. या पद्धतीने कथानकाचे धागेदोरे जुळविण्याची जबाबदारी कमी होत असली तरी स्वाभाविकतेचीं बंधनें बरींच पाळावीं लागतात. हें बंधन कांही ठिकाणीं ढिलें झाल्याने कादंबरींतील कांही मजकूर पात्रांच्या जबान्यांसारखा वाटतो. परंतु समापणांत लेखकाने चांगलें यश मिळविलें आहे. त्यांत सूचकता पुष्कळ आहे. सावकार बापाच्या दोन सावत्र (?) मुलांतील मतभेद परिस्थितीने नाहीसे होअून शेवटीं ते दोघेहि सावकारी पाशाच्या प्रतिकारासाठी वडिलांच्या विरुद्ध आघाडी अुभारतात, त्यांत त्यांच्या मातांची ओढाताण होते, शेवटीं सत्प्रवृत्तींत अुत्पन्न झालेल्या बंधुप्रेमाच्या अुदात्त स्वरूपापुढे त्यांची आंधळी माया हार खाते आणि सापत्नभाव लोप पावतो, अित्यादि घडामोडी लेखकाने परिणामकारक रीतीने दाखविल्या आहेत. सत्याग्रहाच्या कंटाळवाण्या मार्गाचा त्याग करून शेतकऱ्यांनी दंडनीति हातीं घेतलेली लेखकाने दाखविली, परंतु त्या दंडनीतीबद्दल शेवटीं त्यांना पश्चात्ताप झाल्याचें दाखवून अहिंसावादावरील आपली श्रद्धा स्पष्ट केली आहे. मातृप्रेमांतील झगड्याचे प्रसंग रामायणांतील लोकप्रिय प्रसंगांची आठवण करून देतात अितके ते रसभरित आहेत. भांडवलशाहीशीं असलेलें भांडण दयेने मिटणारे नसून हक्कानेच मिटलें पाहिजे हें लेखकाने आग्रहपूर्वक प्रतिपादिलें आहे. कादंबरीचा शेवट मात्र अगदी विरस करणारा आहे. क्रांतीच्या पार्श्वभूमीवर अेकदम शुभमंगल सावधानाचा देखावा अत्यंत रसापकर्षक वाटतो. श्री. खांडेकरांनी प्रस्तावनेंत लेखकाबद्दल काढलेले अुद्गार नुसते व्यावहारिक नाहीत हें कादंबरी वाचून पटतें.

अेका पोर्तुगीज कादंबरीचें 'तीन तरुणी' हें 'स्वैर' भाषान्तर श्री. व्यं. अ. पै रायकर या गोमांतकीय लेखकांनी केलें आहे. ग्रंथारंभींच लेखकाने कांही संभवनीय टीकेचा बंदोबस्त करण्यासाठी 'निवेदन' केलें आहे. कादंबरी वाचून असें वाटतें की त्यांनी भलताच ग्रह, आणि स्वतःच्याच कृतीविषयी, मनांत बाळगला असावा. वाअीट गोष्टींचेंहि चित्रण करण्याचा ललित-वाङ्मयाचा हक्क प्रस्थापित करण्याचा त्यांनी निवेदनांत प्रयत्न केला आहे. वाअीट गोष्टी म्हणजे


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

छेद्दीत कोर्म जाडले. २९८-३०८



संवेदनेचा संथपणें विकास करण्याअैवजी कल्पनेच्या मराऱ्या घेत ते टप्प्याटप्प्याने तिचा परामर्श घेतात. त्यामुळे त्यांच्या लघुनिबंधाला अेकजिनसी स्वरूप प्राप्त होण्याअैवजी अेखाद्या मनोहर पसाऱ्याचें वैभव त्याला प्राप्त झालेलें दिसून येतें. म्हणून श्री. खांडेकरांच्या लघुनिबंधांत मूळ संवेदनेचा रसाळ विकास प्रत्ययास न येतां कल्पना आणि बुद्धि दोन्ही जागृत झाल्याने काव्यमय कल्पना आणि सुरम्य तात्त्विकता यांचा विलास दृष्टीस पडतो. 'भावना' या नमुनेदार लघुनिबंधांत आजारी मित्राला भेट म्हणून नेलेल्या पुष्पगुच्छाचें भावनात्मक महत्त्व पटवितांना त्यांत गूढगुंजनात्मक कादंबऱ्यांचा केलेला अुपहास किंवा फुलांनी सांगितलेलें तत्त्वज्ञान हें न येतां आजाऱ्याच्या खोलींतलें अप्रसन्न वातावरण व रोग्याची कोमेजलेली वृत्ति यांचें साधें सरळ वर्णन आलें असतें तर त्या भावनेंतला ओलावा वाचकांच्या प्रत्ययाला आला असता. तसेंच 'अश्रु' या लघुनिबंधांत लहानपणच्या आजारांत वडिलांच्या डोळ्यांत अश्रु अुभे राहिले तो प्रसंग व तानाजीचें शव पाहतां शिवरायांना गहिवर आला तो प्रसंग या दोन्ही जागा— त्यांचा जर निराळ्या तऱ्हेने अुपयोग करून घेतला असता तर— अितक्या बहारीच्या होत्या की त्यामुळे त्या लघुनिबंधाची हृदयंगमता खचित वाढली असती.

सुबक अलंकारांची व सुभाषितवजा वाक्प्रचारांची मनसोक्त पेरणी, रुचिर आणि रिझवणारा नर्मविनोद आणि मार्मिक अुपहास हे त्यांचे अितर विशेष 'मंदाकिनीं'तील सर्व लघुनिबंधांतून दिसून येतात. त्यामुळे श्री. खांडेकर यांच्या लघुनिबंधाला चमचमीपणा आणि चमकदारपणा प्राप्त झाला आहे.

ना. मा. सं.

---

# स्त्रियांच्या म्हणी

[ पान २७२ वरून पुढे ]

(६१८) अंगांत नाही बळ, चिमटा घेअून पळ.
(६१९) मुसळ सोसेल, पण कुसळ सोसवणार नाही.
(६२०) फिरे तो चरे, बैठा अुपाशी मरे.
(६२१) भुकेला केळें, वनवासाला सीताफळें.
(६२२) शेतचा पसा, कंत्रेचा कसा.
(६२३) कानाला कोपरा जडेना, सासूला जावअी घडेना.
(६२४) स्वप्नांत फराळ करायचा तर थालिपिटाचा का ?
(६२५) नागवणीस सोयरा, हगवणीस बायको.
(६२६) कांही करी भरभर, खाली छप्पर वर घर.
(६२७) माझें नांव घ्या, अन् भीक मागून खा.
(६२८) अंगांत नाही करणी, मला म्हणा तरणी.
(६२९) दुखणें आलें जोरावर, अन् पथ्य आलें शेरावर.
(६३०) तुझें तें माझें, अन् माझें तें माझ्या बापाचें.

नीळकंठ शंकर नवरे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# नियामक मंडळाची सभा

म. सा. परिषदेच्या नियामक मंडळाची सभा ता. २ जून १९४२ मंगळवारी सायंकाळीं ५ वाजतां परिषदेच्या कार्यालयांत भरली होती. सभेस खालील १२ सभासद अुपस्थित होते:-

न. चिं. केळकर, (अध्यक्ष); धा. म. जोशी, दि. वि. काळे, शं. पु. आघारकर, वा. दा. गोखले, द. वा. पोतदार, ध. रा. गाडगीळ, रा. श्री. जोग, रा. ग. हर्षे, कृ. पां. कुलकर्णी, श्री. रा. पारसनीस व र. लु. जोशी.

१. मागील सभांचे वृत्तान्त वाचून ते पक्के करण्यांत आले.

२. १९४१ सालाचें अितिवृत्त व हिशेब मंजुरीकरिता सभेपुढे ठेवण्यांत आले. अितिवृत्तवर्षी परिषदेचे जे सभासद मृत्यु पावले त्यांजबद्दल खालील दुखवट्याचा ठराव सभेने केला:-

"(१) कै. ग. ग. पेंडसे (तहहयात), (२) कै. वि. कृ. देशपांडे, (३) कै. वा. गो. अूर्ध्वरेषे, (४) कै. र. श्री. जोगळेकर, (५) कै. रा. गो. कानडे, (६) कै. सरदार ना. य. मिरीकर, (७) कै. ल. गं. काळे या परिषदेच्या सभासदांच्या मृत्यूमुळे परिषदेच्या या नियामक मंडळाच्या सभेस अत्यंत दुःख होत आहे."

कचेरीच्या वार्षिक हिशेबाबरोबरच ट्रस्टींचेहि हिशेब प्रसिद्ध करण्यांत यावेत अशी डॉ. शं. पु. आघारकर यांनी सूचना केली व तसा प्रयत्न होत असल्याबद्दलची चिटणिसांनी माहिती दिली. डॉ. आघारकर यांनी हिशेबाच्या पद्धतीबद्दल कांही अुपयुक्त सूचना केल्या.

यानंतर हें अितिवृत्त व हिशेब मंजूर करण्याबद्दल प्रो. रा. श्री. जोग यांनी रीतसर सूचना मांडली व तीस डॉ. रा. ग. हर्षे यांनी अनुमोदन दिल्यानंतर सदर अितिवृत्त व हिशेब हीं मंजूर करण्यांत आलीं.

३. १९४१ या वर्षी अंदाजपत्रकापेक्षा खालील बाबतींत अधिक खर्च झाला:—

पत्रिका रु. ८६-१४-६, संमेलन ठराव अंमलबजावणी रु. ३५-७-६, शाखा सभांस द्यावयाची रक्कम रु. १५-०-०, परिभाषापरिषद् रु. ८-१०-०, संमेलनखर्च रु. ४-९-६.

या अधिक खर्चास मान्यता देण्याबद्दल प्रो. कृ. पां. कुलकर्णी यांनी सूचना मांडली तीस प्रो. श्री. रा. पारसनीस यांनी अनुमोदन दिल्यावर वरील सूचना सभेने मंजूर केली.

४. यापुढे वार्षिक अितिवृत्तांत बाकीदार सभासदांच्या बाकी-वर्गणीचा आंकडा देण्यांत यावा अशी सूचना सभेने केली.

५. यानंतर कार्यकारी मंडळाने तयार केलेलें अंदाजपत्रक मंजुरीसाठी सभेपुढे ठेवण्यांत आलें. प्रि. वा. दा. गोखले यांनी हें अंदाजपत्रक मंजूर करावें अशी सूचना मांडली व तीस डॉ. शं. पु. आघारकर यांनी किरकोळ दुरुस्ती सुचवून अनुमोदन दिल्यावर हें अंदाजपत्रक सभेने मंजूर केलें. (हें अंदाजपत्रक सोबत छापलें आहे.)

हीं कामें झाल्यानंतर अध्यक्षांनी सभा विसर्जन केली.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## अंदाजपत्रक १९४२

| उत्पन्न | खर्च | गतवर्षीतील खर्च |
|---|---|---|
| २८३ ०-१० शिल्लक | ११९०-०- ० कचेरीखर्च | ९३२-१४-३ |
| ७५० ०- ० व्याज (ट्रस्टी) | पगार ८५०-०-० | |
| ७०-०- ०. व्याज(इचलकरंजी) | प्रॉव्हि. फंड ४०-०-० | |
| २०००-०- ० साधा. सभा. वर्गणी | भुईभाडें १५-०-० | |
| ६०-०- ० पत्रिका वर्गणी | म्युनि. कर ३२-०-० | |
| ७५-०- ० संलग्न संस्था वर्गणी | वीज ३३-०-० | |
| ७५-०- ० ग्रंथविक्री | टपाल १००-०-० | |
| ६००-०- ० परीक्षा शुल्क इ. | लिखाई १०-०-० | |
| ५०-०- ० जाहिराती | किरकोळ छपाई ६०-०-० | |
| ३००-०- ० संमेलन देणगी | सादिल ५०-०-० | |
| २००-०- ० भाडें व इतर उत्पन्न | ११९०-०-० | |
| ३०-०- ० किरकोळ | २००० ०- ० पत्रिका खर्च | २०८६- ८-३ |
| | छपाई १६०० ०-० | |
| | टपाल ४००-०-० | |
| | २०००-०-० | |
| | ५०-०- ० संमेलनखर्च | ५४- ९-६ |
| | ५०-०- ० संमेलन टराव अंमल बजावणी | ८५- ७-६ |
| | १५०-०- ० शाखा सभा | ११५- ०-० |
| | १५० ०- ० प्रवास, प्रचार | ८०-१३ ० |
| | ७५-०- ० उपसमित्या | २०-१५ ० |
| | १५०-०- ० परीक्षाखर्च | १६२-१५-० |
| | ५०-०- ० सामान | ११-१४-० |
| | ७५-०- ० किरकोळ | ५१- ०-९ |
| | ३५०-०- ० संमेलन परिषद् इतिहास | |
| | २००-०- ० निवडणुकीचा खर्च | |
| | ३-०-१० शिल्लक | |
| ४४९३-०-१० एकूण | ४४९३-०-१० एकूण | |



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# परिषद्वार्ता

[ चिटणिसांकडून ]

**कार्यकारी मंडळ—** ता. २६ जुलै दिवशीं भरलेल्या कार्यकारी मंडळाच्या सभेंत पटवर्धन–स्मारक–समितीकडून अिमारत व अितर स्मारकयोजनांच्या खर्चाविषयी आलेल्या शिफारशींचा विचार होअून या शिफारशी मंजुरीसाठी विशेष साधारण सभेपुढे ठेवाव्यात व समागृहाचें नांव बदलण्याच्या सूचनेचाहि विचार व्हावा असें सभेने टरविलें.

सोलापुरास लवकरच स्थापन होणाऱ्या शाखासभेची घटना तयार करण्यास प्रां. वा. म. जोशी व रा. सा. र. लु. जोशी यांस कार्यकारी मंडळाच्या वतीने प्रतिनिधि म्हणून नेमण्यांत आलें.

परिषदेचा सहामाहीचा जमाखर्च सभेपुढे मांडण्यांत आला.

**महाराष्ट्र विद्यापीठ—** सरकाराने नेमलेल्या समितीकडून आलेल्या प्रश्नावलीचा कार्यकारी मंडळाने नेमलेल्या समितीकडून सविस्तर विचार होअून परिषदेच्या धोरणाप्रमाणे महत्त्वाच्या प्रश्नांची अुत्तरें देण्यांत आलीं.

**संमेलन—** शंभर सभासदांच्या नोंदणीनंतर आता नाशकास स्वागतमंडळ स्थापन झालें असून श्री. गो त्र्यं. अुर्फ नानासाहेब चांदवडकर यांस कार्याध्यक्ष व श्री. बा. मो. कानिटकर, श्री. वा. के. खरे, श्री. प्र. ब. औरंगाबादकर, श्री. रा. वि. रहाळकर, श्री. पु. रा. बुरकुले यांस सरचिटणीस नेमण्यांत आलें. परिषदेच्या सभासदांनी हल्लीच्या बिकट परिस्थितींत नाशिककरांस शक्य तितकें साहाय्य करावें अशी आग्रहाची विनंती आहे.

संमेलनाध्यक्षपदासाठी परिषदेच्या नियामक मंडळाकडून सुचविलेल्या नांवापैकी पांच नांवांची निवड झाली ती वर्णानुक्रमें येणेंप्रमाणे—

१ आचार्य प्रल्हाद केशव अत्रे, २ प्रो. कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी, ३ आचार्य शंकर दत्तात्रेय जावडेकर, ४ श्री. गजानन त्र्यंबक माडखोलकर, ५ श्री. पांडुरंग सदाशिव साने, ( साने गुरुजी ).

**परीक्षा—** परीक्षार्थी अुमेदवारांकरिता प्रा. वा. दा. गोखले यांच्या नेतृत्वाखाली पुण्यास प्राज्ञ व विशारद या परीक्षांसाठी वर्ग सुरू करण्यांत आले आहेत. जागेच्या अडचणीमुळे भावे हायस्कूलचे सुपरिंटेंडेंट श्री. नी. वा. किंकर यांच्या कृपेने त्यांच्या हायस्कुलांत तूर्त हे वर्ग भरविण्यांत येत आहेत.

**अितर—** सध्याच्या परिस्थितींत परिभाषापरिषद् भरविणें बिकट असल्यामुळे ती पुढील वर्षी भरविण्याचा विचार आहे.

प्रतिवर्षाप्रमाणे ता. २ जून दिवशीं अुन्हाळ्याच्या सुट्टींत येणारी पाहुणे मंडळी व परिषदेचे पुण्यांतील सभासद यांस परस्परपरिचय होण्याच्या दृष्टीने अेकत्र आणण्याची व्यवस्था करण्यांत आली.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# नवीन सभासद

### तहहयात सभासद

श्री. बाबूराव गणपतराव जगताप, पुणें
श्री. विनायक पांडुरंग वोकील, ,,
प्रा. मोहिनीराज लक्ष्मण चंद्रात्रेय, ,,
श्री. त्र्यं. र. देशमूख, अहमदनगर

### साधारण सभासद

प्रा. भालचंद्र विष्णु माटवडेकर, मुंबअी ४
सौ. मालिनी दत्तात्रेय सवाअी, मुंबअी १०९
प्रा. भालचंद्र पुंडलीक आडारकर, अलाहाबाद
श्री. शरच्चंद्र अनंत गोपुजकर, मुंबई ६
,, भ. व्यं. देशमूख, हिप्परगे

### सोलापूर

श्री. विश्वनाथ भिकाजी साठे
,, बाबूराव नरसप्पा जक्कल
,, शंकर गोविंद पटवर्धन
,, गोपाळ रघुनाथ कुंभकोणी
,, माधवराव खंडेराव पाकणीकर
,, मडिवाळप्पा बंडप्पा काडादी
,, देवराव शिवराव कुंदाजे
,, वासुदेव विष्णु फडके
डॉ. मुकुंद अनंतराव प्रभू
श्री. विष्णु नारायण शिवापूरकर
कु. शशिकला बाबूराव आळंदकर
श्री. पद्माकर बाबूराव आळंदकर
,, राजाराम विठ्ठल जोशी
,, जोसेफ सेंट ॲन व्हेगस
, शिवराम जगन्नाथ दिवाडकर
,, लक्ष्मण विनायक देअूसकर
,, पुरुषोत्तम गणेश गोगटे
,, विठ्ठल दत्तात्रेय नागवंशी
,, माणिकचंद मोतीचंद शहा
,, गणेश रामकृष्ण पागे
,, कालीदास द. देसाअी
,, प्रभाकर दत्तात्रेय वढावकर
,, यशवंत बाळकृष्ण वर्दे
,, भगवंत जनार्दन म्हात्रे
डॉ. सदाशीव काशीनाथ आपटे
श्री. जगन्नाथ त्रिंबक पुणतांबेकर
,, अेकनाथ नारायण गोडबोले
,, दत्तात्रेय दामोदर देवगांवकर
,, रामकृष्ण व्यंकटेश बेत
,, सीताराम विठ्ठल अिरावत्ती
,, मलय्या रामय्या पुल्ली
,, रामचंद्र शिव बुर्गुल
,, नारायण शेपण्णा संगा
,, भिकाजी लक्ष्मण कवडी
,, विठ्ठल सिधराम महिंद्रकर
,, वासुदेव दाजी लिमये
,, मारुति दिनानाथ पवार
,, माधव विष्णु मोडक
,, प्रभाकर श्रीनिवास काकडे
,, लक्ष्मण गोविंद काकडे
,, विष्णु वासुदेव कंदलगांवकर
,, रामचंद्र कृष्ण गोटे
,, जगदेवराव अण्णाराव देशमुख
,, पंढरीनाथ माधव कामतकर
,, रामचंद्र गणेश फडके
,, सी. स. मामडयाळ
,, ह. म. चिलका
,, कृ. दत्ताराम नखेरकर
,, ह. वि. शेटे
,, कृष्णराव दत्ताराम नेरुरकर

### पुणें

श्री. लक्ष्मीकांत रंगाचार्य रड्डी
मिस् जेन रन्सिमन वॉट
श्री. विठ्ठल नारायण ठकार
,, जनार्दन दत्तात्रय गोंधळकर
,, नारायण रामचंद्र दंडवते
,, दत्तात्रेय गोविंद नातू
प्रा. दत्तात्रेय गोपाळ कर्वे
श्री. माधव श्रीनिवास गोसावी
कु. अनसूया रामचंद्र भागवत


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

श्री. धोंडीराम गुलाबचंद खिवसरा
,, नरहर गणपतराव पवार
,, शामराव नरहर परांडकर
,, श्रीधर शामराव हणमंते
डॉ. गजानन श्रीपत खैर
श्री. रघुनाथ नारायण चापेकर
,, गणपतराव बाळाजी बोरवणकर
,, शंकर रामचंद्र दाते
,, श्रीपाद गणेश गोखले
डॉ. विठ्ठल शिवराम सोवनी

डॉ. पंढरीनाथ मुकुंद डांगरे
,, श्रीधर दत्तात्रेय बोकील
श्री. लक्ष्मण रघुनाथ गोखले
,, हरि पुरुषोत्तम परांजपे
,, रामचंद्र कृष्ण साठे
,, दत्तात्रेय पिलाजी अत्रे
,, सदाशिव वासुदेव दर्शने
,, रामचंद्र काशीनाथ भिडे
,, तोताराम पुनां अत्तरदे

## रद्दींतील रत्नें

### पेशवाअीनंतर

[या कटावाचीं चारच पानें मिळालीं. पेशवाअी जाअून अिंग्रजी अमदानी आली त्या वेळची परिस्थिति कवीने चांगली वर्णिली आहे. कोण कवि समजत नाही.—चिं. ग. कर्वे]

...... दिक्षितात भिक्षुक विद्या ।। तिही नसेल वाटे पुरती ।। विद्या म्हणुनी मुळी बुडाली ।। अिंग्रजाच्या आंगीं मुरली ।। भाद्रपदांत माअु आटपले ।। आश्विनमासी सर्व अुधळले ।। आद्दिवर्ते बापु गोखले ।। स्वताहाच लढुनी रणांत पडले ।। श्रीमंताची स्वारी निघाली ।। ब्रह्मवरती जाअुन बसली ।। सन सैत्रा[2]विसांत अिंग्रजी झाली ।। नाहीं कोठें धूम अुडाली ।। [3]राबिसनानें स्वतां जातिने । पेशव्याच्या वाड्यावरते ।। अुमा भावटा करुनी गेले ।। मग आवघ्या पुण्यांत कळले ।। रौबिसनाची हिकमत मोठी ।। सर्वत्राना देअुनि भेटी ।। बोलुन त्याशी गोड गोष्टी ।। सावसावकार अुदमी चाटी ।। रयतेलागीं धरुनी पोटीं ।। वहीवाट होतीं देशी जाची ।। तशीच लीहीली खर्चीं त्याची ।। नाही धरली आशा जमेची ।। दुरवर दृष्टी अिंग्रजाची ।। नाहि केली वा[4]टावाटी ।। चौकशीअंती जमा शेवटी ।। [5]राणिसाहेब ही जनधात्री ।। प्रथमपासुनी बांधुन जंत्री ।। जंत्रीवरुनी प्रधान मंत्री ।। तीन गव्हरनर अेकसुत्री ।। जग वर्तवी लाअुन गोत्री ।। सर्व वर्तती याच्या तंत्री ।। राणीसाहेब आल्यापासुनी ।। अिंग्रजी प्रसिद्ध जाली तेथुन ।। अिंग्रजी अैशी दिसूं लागली ।। कांहीं दृष्टीपुरत चालली ।। अिंग्रजी राज्य अुत्तम म्हणती ।। नाही कोणाला जुलूम जाजती ।। राणीचरणी लक्ष ठेविती ।। अिंग्रजाची आक्कल मोठी ।। पाहायाच्या आनंत युक्ती ।। युक्तियुक्तिनें साधून घेती ।। दुःख कोणाला कधी न देती ।। चार वर्षामधें नविन बाबिची ।। खुपी रितीनें किती तरी प्राप्ती ।। जमिनीवर्ती दर ठरोती ।। जेव्हां कांही [6]औवघी होअील ।। तेव्हां जाजती जमा किती ती ।। जमिनीवरुनी दीसून येअील ।। दरावरची मुख्य निराळी ।। जमा साधिता कीति तरी होअील ।। याचा कांहीं आंत नाहीं ।। .........

१ सदाशिव माणकेश्वर, बाजीरावाचा अेक कारभारी. २ १८१७ त. ३ राबिन्सन, पुण्याचा अिंग्रजी रेसिडेंट. ४ बाटावाटी किंवा बःटावाटो. ५ कवीची चूक आहे. त्या वेळीं व्हिक्टोरिया गादीवर नव्हती. ६ अवधी (?).

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## साभार–स्वीकार

१. *Royal Coronation And My Second Trip to Europe (1937)*—Shrimant Sir RaghunathRao ShankarRao Pandit Pant Sachiv, K.C. I.E., Raja of Bhor. Published by L. R. Sane, Esqr., Private Secretary to the Rajasaheb of Bhor.

२. **जपानची जीवनक्रांति व ३. पाश्चिमात्य शिक्षणपद्धति**–ले० डॉ. ग. श्री. खैर; प्रका० श्री. वि. गं. केतकर, व्यवस्थापक अ. वि. गृह, ६२४ सदाशिव, पुणें २; मूल्य अनुक्रमें रु. २ व ३.

४. **रस-विमर्ष**–ले० प्रा. के. ना. वाटवे, अेम्. अे.; प्रका० नवीन किताबखाना, पुणें.

५. **झांजर**—ले० श्री. म. भा. मायनेकर; प्रका० नवभारत प्रकाशन संस्था, मुंबअी ४; मुल्य रु. १.

६. **सुबोधसंवाद**—ले० ल. वा. मावे, बी. अे, बी. टी.; प्रका० नवभारत संस्था, मुंबअी ४; मूल्य ४ आणे;

७. **माझी नभोवाणी**—ले० ग. त्र्यं. माडखोलकर; प्रका० देशमूख आणि कं. १९१ शनिवार, पुणें २. मूल्य २॥.

८. **माझी डायरी**—ले० विद्यार्थी; प्रका० दि प्रकाशमाला लि. अमळनेर; मूल्य ८ आणे.

९. **प्रणामांजलि**—ले० गो. चि. भाटे; प्रका० मा. गो. भाटे, ८३० सदाशिव, पुणें २. मूल्य रु. २.

१०. **पुणें नगर संशोधन वृत्त-खंड १ ला**—संपा० व प्रका० श्री. चिं. ग. कर्वे, चिटणीस, पुणें नगर संशोधन समिति; मा. अि. सं. मंडळ, पुणें २. मूल्य रु. २.

११. **अनौपचारिक मुलाखती**— ले० य. गो. जोशी; प्रका० वि. ह. दामले; नवीन किताबखाना, पुणें २. मूल्य रु. २॥.

**साधना** मासिक— (वर्ष १ लें व वर्ष २ रें अंक १–६) संपा० श्री. ग. वा. गोडसे, सातारा; वा. व. ट. ख. सह रु. १॥=.

---

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेचीं पहिलीं तेरा वर्षें

अर्थात्

## पत्रिकेच्या अंकांचीं वर्षशः बांधलेलीं तेरा पुस्तकें

दर पुस्तकांत अभिप्राय, अैतिहासिक, चरित्रें, निबंध, पुस्तकपरीक्षण, भाषिक शंकाचर्चा, सामाजिक, अित्यादि विषयांवर सदरें असून, सर्व मिळून महाराष्ट्र-भाषा, वाङ्मय, समाज, अितिहास यांसारख्या विविध क्षेत्रांतील नवीन विद्वत्ताप्रचुर विचार आणि माहिती मिळणार आहे.

**किंमत**— सुंदर कापडी बांधणी विषयसूचीसह दर वर्षाच्या पुस्तकास ४ रुपये, परिषदेच्या सभासदांस २ रु.; ट. ख. निराळा.

**वि. सू.**— चौदाव्या वर्षाच्या पुस्तकाच्याहि बांधीव प्रती तयार आहेत, परंतु या प्रत्येक प्रतीस सभासदांसहि ४ रुपये पडतील; ट.ख. निराळा.

## 'मराठी भाषेचा व वाङ्मयाचा अितिहास'

### महानुभावअखेर

लेखक—कै. बाळकृष्ण अनंत भिडे, आकार– रॉयल अष्टपत्री, पृष्ठें–१२५. अुत्तम बांधणी. किंमत फक्त अेक रुपया. परिषदेच्या सभासदांस बारा आणे; ट. ख. वेगळा..

विशेष माहितीसाठी लिहा :—

चिटणीस,
म. सा. परिषद्, टिळक रस्ता, पुणें २

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता वामन मल्हार जोशी यांनी प्रसिद्ध केलें.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद